हा मनुष्यमात्राला आवश्यक आहे, असा दृष्टिकोन मुख्यतः गृहीत धरला आहे. त्यामुळे परंपरागत जातिभेदाची पार्श्वभूमि प्रथमतःच सर्वत्र आहे असे अनुमान करता येते. " मनुष्य जन्माने शूद्र असतो, पण त्याला संस्काराने द्विजत्व प्राप्त होते. या दोहोंत विद्येची भर पडली तर त्याला खरा ब्राह्मण म्हणावयाचे. अशा हा जन्म, संस्कार आणि विद्या यांच्या समुच्चयाने होणारा पुरुष आदर्श म्हणून समाजपुढे आम्हाला ठेवावयाचा आहे." " संस्कारांचे स्वरूप इतके व्यापक आहे की स्त्रीपुरुष, उच्चनीच, असा भेद याबाबत नाही. सर्वांनाच संस्काराची म्हणजे ध्येयवादाच्या निष्ठेची अत्यंत आवश्यकता आहे." असा हा व्यापक विचार या ग्रंथमालेच्या मुळाशी आहे.

धार्मिक शिक्षणाचे एक चांगले साधन म्हणून ही पुस्तकमाला उपयोगी पडणार आहे. धार्मिक शिक्षण म्हणजे आध्यात्मिक शिक्षण. माणसाच्या ठिकाणी असलेले सुप्त गुण जागृत करणे व माणसाला आशावादी बनवणे, असा आध्यात्मिक शिक्षणाचा अर्थ येथे केला आहे. त्याकरिता या पुस्तकाला प्रारंभ उपनयन संस्कारापासून केलेला आहे. उपनयन संस्कार म्हणजे धार्मिक शिक्षणाचा शुभारंभ होय, अशी समर्पक व्याख्या यात दिली आहे.

उपनयन संस्कार सांगितल्यानंतर संध्यावंदन, पूजा, पंचमहायज्ञ यांचे विवरण या पहिल्या पुस्तकात केले आहे. संध्या, पूजा व पंचमहायज्ञ या तीन प्रकारच्या उपासना जो मनुष्य करतो तो धार्मिक हिंदु होय असे म्हणता येईल. मानसिक पावित्र्य आणि प्रसन्नता संध्या व पूजा यांच्यापासून प्राप्त होते. पंचमहायज्ञ हे विश्वातील मानवाचे स्थान व विश्वाबद्दल माणसाचे कर्तव्य यांचे सूचक आहेत. मनुष्य हा सर्व विश्वाचा ऋणी आहे, याची जाणीव हे यज्ञ देतात. प्राणिमात्राबद्दल माणसाचे काही कर्तव्य आहे, हे भूतयज्ञात सूचित होते. माणसा माणसाचे संबंध सद्बुद्धीचे असावेत याची कल्पना मनुष्ययज्ञ देतो. पूर्वजांचे ऋण माणसावर मोठे आहे याचे स्मरण पितृयज्ञ देतो. परंपरेने प्राप्त झालेली विद्या राखली पाहिजे अशी आज्ञा ब्रह्मयज्ञाने मिळते, आणि विश्वातील दैवी शक्तींची आराधना करून मनुष्य पवित्र होतो अशा तऱ्हेची भावना देवयज्ञाने मिळते. आत्मोन्नति आणि पूर्णता यांची सर्वांगीण साधना

पंचमहायज्ञाच्या रूपाने व्यक्त होते. प्रस्तुत लेखकाने पंचमहायज्ञाचे अशा प्रकारचे मर्म ओळखून त्याचे विवरण केले आहे.

मूळ संस्कृत कर्मकांड आणि वैदिक व पौराणिक मंत्र देऊन त्याचे मराठी, सुबोध विवरणही त्याच्याच बरोबर दिले आहे. पूजाप्रकरणातील मानसपूजा हे तिसरे परिशिष्ट पूजेचा आध्यात्मिक खोल अर्थ देते. श्रीशंकराचार्यविरचित व श्रीतुकारामविरचित मानसपूजा याचे पाठांतर करणाऱ्या चिंतनशील मनुष्याने बाह्यपूजेचे कर्मकांड वगळले तरी चालेल, मूळ उपासना मात्र दृढपणे चालणारी अशा विचार उत्पन्न होतो.

धार्मिक साहित्यात या मालेने महत्त्वाची भर घातली जाणार आहे. याबद्दल मालाकाराचे आम्ही अभिनंदन करतो.

प्राज्ञ पाठशाळा, वाई
१ नोव्हेंबर १९६५

लक्ष्मणशास्त्री जोशी

# प्रस्तावना

"कुमारासाठीं धार्मिक संस्कार आणि नित्यकर्मे" हे पुस्तक भारतीय धर्मकोश मंडळाच्या संस्कृति शिक्षण मालेचें प्रथम पुष्प म्हणून वाचकांना सादर करताना मला आज अत्यंत समाधान होत आहे. उपनयन होऊं घातलेल्या कुमारासाठीं प्राचीन धर्मशास्त्रात जे संस्कार आणि जीं नित्यकर्में सांगितलीं आहेत तीं या ग्रंथात सार्थ, सटीक आणि या विधींची पार्श्वभूमी सांगणाऱ्या विस्तृत प्रास्ताविकासह समाविष्ट करण्यात आलीं आहेत.

कुमारांना करावयाच्या धार्मिक विधींमध्ये 'उपनयन' हा एक संस्कार आणि 'संध्या', 'पूजा', 'वैश्वदेव' आणि 'ब्रह्मयज्ञ' हीं चार नित्यकर्में यांचा समावेश होतो. ते सारे विधी याच क्रमानं 'धार्मिक संस्कार आणि नित्यकर्मे' या पुस्तकात समाविष्ट करण्यात आले आहेत. आपल्या धर्मांतील आचाराची माहिती कुमार वाचकांना देणे हा या पुस्तकाचा मुख्य हेतु आहे.

या ग्रंथात एकत्र करण्यात आलेल्या धार्मिक विधींचीं स्वतंत्र पुस्तकें ४५ वर्षांपूर्वी आम्ही प्रकाशित केलीं. त्या काळीं आचार प्रत्यक्ष चालू होते. संस्कृत भाषेशीं लोकांचा अधिक परिचय होता. वेदांतील मंत्रहि पाठ असत. पण त्यांचे स्पष्टीकरण करावें, अर्थ कळावा व डोळसपणे आचार व्हावा म्हणून हीं पुस्तकें लिहिलीं. छोटा आकार, अल्प किंमत व मराठींतून स्पष्टीकरण यामुळे पुस्तकें अत्यंत लोकप्रिय झालीं. अनेक आवृत्त्या निघत राहिल्या.

आज तर धार्मिक संस्कार आणि नित्यकर्मांची सविस्तर माहिती देणाऱ्या पुस्तकाची आवश्यकता अधिक वाटली आहे. आचार, संस्कृत, आणि मंत्र यापासून लोक अधिकच दूर चालले आहेत. पण त्यांची ओढ मात्र कमी झालेली नाही. धर्म समजून घेण्याची इच्छा जागृत आहे. त्याकरिता हे विधी नव्या स्वरूपात प्रसिद्ध करण्याचा हा उपक्रम आहे.

मूळ विधी आणि त्याचे मंत्र संस्कृतमध्यें देऊन त्यांचें स्पष्टीकरण मराठींत दिलेलें आहे. यामागील रहस्य समजेल अशा भाषेंत त्यांची मांडणी केली आहे. धर्माबद्दल आदर वाढावा, त्यातील तत्त्वें मनावर ठसावीत व संक्षेपानें का होईना आचार पार पाडण्याची बुद्धि व्हावी म्हणून हा प्रयत्न आहे. त्याचें आजपर्यंत झालें तसेंच स्वागत होईल असा विश्वास आहे. 'संस्कृति शिक्षण माले'तून याच तऱ्हेचीं अन्य काही पुस्तकं प्रसिद्ध करण्याचा मंडळाचा विचार आहे. ही सारीं पुस्तकें यथावकाश प्रसिद्ध होतील.

नव्या एकत्रित स्वरूपात हे सारे विधी प्रसिद्ध करण्याची कल्पना आमचे तरुण मित्र श्री. बा. ना. तडवळकर यांनीं सर्वप्रथम सुचविली. आमच्या मंडळाचे कार्याध्यक्ष श्री पां. ज. चिन्मुळगुंद आय. सी. एस्, तसेच सदस्य डॉ. ना. कृ. भिडे, एम् डी, नवी दिल्ली आणि श्री. चिं. रा. बाद्रे यांनीं त्याबाबत उपयुक्त सूचना दिल्या. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ आणि प्रा. गोवर्धन पारीख या *सुहृदांच्या सल्लामसलतीचा लाभ मंडळाच्या अन्य प्रकाशनाप्रमाणे या पुस्तकासहि* झालेला आहे. त्याबद्दल या सर्वांचा मी ऋणी आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ यांनी या मालेचे सांस्कृतिक महत्त्व ओळखून तिच्या पहिल्या तीन पुष्पांच्या प्रकाशनार्थ आर्थिक साह्य दिले आहे. त्याबद्दल या मंडळाचे मी मन:पूर्वक आभार मानतो.

वैदिक मंत्राचा कंपोज वेदविद्या मुद्रणालयाचे चालक श्री. स. रा. सरदेसाई बी. ए. एल् एल् बी. यांनी अगत्यानं करून दिला त्याबद्दल त्यांचा, आणि सुबक मुद्रणाबद्दल साधना प्रेसचा मी आभारी आहे

भारतीय चरित्रकोश मंडळ,
पुणे ४.
बलि प्रतिपदा,
( २५-१०-१९६५ )

**सिद्धेश्वरशास्त्री चित्राव**
अध्यक्ष

## संस्कृति शिक्षण माला

## — आगामी प्रकाशनें —

### वैदिक सूक्तपाठ

या ग्रंथात चारहि वेदांतील निवडक सूक्तांचा समावेश केला आहे. नित्य उपासनेतील शिव, देवी, विष्णू, गणपती व सूर्य यांची वैदिक स्तोत्रे यात दिलेली आहेत. त्याप्रमाणे तत्त्वज्ञानपर सूक्तें, राष्ट्रीय प्रार्थना, भूमि सूक्त वगैरेंचाहि यात समावेश आहे.

मूळ मंत्र, त्यांचा अर्थ व थोडें स्पष्टीकरण अशी ग्रंथाची रचना आहे. मूळ मंत्र वैदिक पद्धतीप्रमाणे स्वरांसह शुद्ध छापले आहेत. अर्थ व विवरण सोप्या मराठीत दिलेले आहे. देवतांची माहिती आधुनिक विकासात्मक पद्धतीनें संग्रहीत केली आहे.

वेदांचे अभ्यासक व देवतांचे उपासक अशा दोघांनाहि हा ग्रंथ उपयुक्त वाटेल असा विश्वास आहे.

* * *

### धर्म-तत्त्व-संग्रह

या ग्रंथात वैदिक धर्माप्रमाणेच जैन, बौद्ध, ख्रिस्ती, मुसलमान, पारसी, यहुदी वगैरे जगांतील प्रमुख धर्मांची तत्त्वेंहि प्रश्नोत्तर रूपानें संग्रहीत केली आहेत. यांत कोणत्याहि धर्माचा पुरस्कार केलेला नसून सर्व धर्मांची मूळ तत्त्वें एकच आहेत, हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.



भारतीय चरित्रकोश मंडळ, पुणें ४.

माझे प्रिय पौत्र
चि. विश्वास चित्राव
चि महेश चित्राव
यांना आशीर्वादपूर्वक

# अनुक्रमणिका

श्रीवर्चस्वम् आयुष्यम् आरोग्यम् आविधाच्छोभमान महीयते
धन धान्य पशु बहुपुत्रलाभ शतसंवत्सर दीर्घमायु ॥ (ऋ. परिशिष्ट ११.२९)

उत्तम सतेज शरीर, आयुष्य आणि आरोग्य मला उत्तमापासून लाभावे.
धन, धान्य, पशु, संतति यांनी समृद्ध असे शंभर वर्षे आयुष्य मला प्राप्त व्हावे.

# धर्माचे जीवनांतील स्थान

*संस्कारै द्विज उच्यते ।*

प्राणी जन्माला येतो, नंतर त्यावर अनेक संस्कार होऊन त्याला नराचे नारायण होता येते. मनुष्य हा मुद्दा एक प्राणीच. मनुष्यानं विचार करून ज्ञान मिळविलं. त्या ज्ञानाच्या जोरावर आपल्या उत्कर्षाचे अनेक मार्ग शोधून काढले. त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करून आपली प्रगति करून घेतली आजची मनुष्यप्राण्याची प्रगति एका दिवसात सहज झालेली नसून ती हजारो युगाची फलश्रुति आहे. याप्रमाण मनुष्य हा सतत उत्कर्षाकडे जाणारा असून त्याची ही साधना अखंड चालू आहे. मनुष्यप्राणी व इतर जनावरे यांच्यातील हाच मोठा फरक होय. म्हणूनच आपल्या धर्मशास्त्रात परम कल्याण साधावयाचें असल्यास मनुष्यजन्मच प्राप्त झाला पाहिजे असा सिद्धांत आहे, विचार करण्याची विशेष शक्ति मनुष्यामध्यें आहे, म्हणूनच त्याला मनुष्य किंवा मानव ही संज्ञा प्राप्त झाली आहे.

## प्रगतिकरिता बंधनं पाळा

मनुष्यप्राण्याच्या प्रगतीच्या इतिहासात विचार करण्याच्या शक्तीला पहिलं स्थान आहे. विचारानं प्राप्त झालेलं निश्चयात्मक ज्ञान व्यवहारांत उतरविणें याला मनुष्यप्राण्याच्या प्रगतीत अत्यंत महत्त्वाच स्थान आहे. विचारानें मिळविलेलें ज्ञान सतत टिकविणं हा त्यापुढील महत्त्वाचा टप्पा होय. विचार व ज्ञान टिकविण्याकरितां फार मोठी तपश्चर्या करावी लागते. मनुष्यस्वभाव विसराळू

व स्वैरतेकडे झुकणारा आहे. त्याला विसराळूपणा नष्ट करण्याकरितां त्याला सारखी आठवण द्यावी लागते. त्याला सारखे जागृत ठेवावें लागते. जागृत ठेवून ध्येयावरून मन चळूं नये म्हणून त्याला अनेक नियमांची बंधनें उत्पन्न करावी लागतात. हीं बंधनें म्हणजे धर्मातील अनेक नियम, आचार व संस्कार होत.

जेवढी मनुष्याची योग्यता जास्त तेवढी त्याला बंधनें अधिक. नियमपालनांचा काटेकोरपणा त्याला अधिक पाळावा लागतो. उंच जागेवर चढणाराला पतनाचें भयही अधिक आणि पतनामुळें होणारी अधोगतिही भयानक. म्हणून इतर प्राण्यांपेक्षा मनुष्यप्राणी हा अधिक नियमबद्ध आहे. तसेंच मनुष्यप्राण्यांतही जे अधिक नियम पाळतात व विचारानें ज्ञान संपादन करून त्या ज्ञानाचा जगाला उपयोग करून देतात, त्यांना अधिक शिस्तीची आवश्यकता असते.

### नराचा नारायण कसा झाला

मनुष्यप्राण्याच्या इतिहासांत अगदीं वन्य अवस्थेपासून आजच्या नागरिक अवस्थेपर्यंतची प्रगति आपल्याला स्पष्ट दिसत आहे. शिकार करून कच्चें मांस खाणाऱ्या प्राण्याच्या अवस्थेतून आजच्या प्रगत अवस्थेला मनुष्यप्राणी आला आहे. प्रथम तो इतर प्राण्याप्रमाणें चार पायावरच चालत असे. गिरिकंदरांत किंवा झाडावर राहाण्यापेक्षां अधिक सुखसोईची कल्पना त्याला नव्हती. घर करून स्थायिक होणें ही कल्पना त्याला क्रमानें सुचली. कच्चें अन्न खाण्यापेक्षां तो तें भाजून खाऊं लागला. शिकार करण्यापेक्षां शेती करणें त्याला बरें वाटलें. तो घर करून एका जागीं राहूं लागला. विवाहसंस्था त्यानें निर्माण केली. ग्राम-संस्थेचा क्रमानें पाया घातला गेला. तो प्रथम दगडाचीं हत्यारें करूं लागला. नंतर त्याला धातूचा शोध लागला. चाकासारख्या यंत्राचा त्यानें शोध लावला अग्नि आणि वाफ यांना त्यानें वेठीला धरलें. आगगाड्या आणि बोटी यांच्या प्रगतीतून विजेचा शोध लागला. आज बहुतेक कामें विजेवर चाललीं आहेत व अणुशक्तिही हस्तगत झाल्यासारखी आहे.

### मनावर नाचतो धर्म

ही प्रगति वन्य संस्कृतींतून झालेली नाहीं. नागर संस्कृतींतून झालेली आहे. प्राण्याला स्थिरपणा मिळाल्यावर माणसाला मनुष्यपणा प्राप्त झाला. मनुष्यानें

आणि संस्कार, आज हजारो वर्षे हिंदुधर्मीयांच्या घरामधून परंपरेने चालत आलेले आहेत. विचार, उच्चार आणि आचार असा मानवी मनोव्यापाराचा क्रम मानण्यात येतो. आपल्या मनात येणाऱ्या विविध विचारांपैकी फार थोडे आपणास प्रत्यक्ष उच्चार करण्यासारखे वाटतात, आणि त्यांपैकी काही आपण आचारात ग्रथित करून प्रत्यक्ष व्यवहारात त्यांना कायमचे स्थान देतो. यावरून आचार हे आपल्या परिपक्व विचाराचे मूर्तस्वरूप आहे, असे ठरते. म्हणूनच समाजाचे किंवा व्यक्तीचे अंतःकरण त्यांच्या आचारावरून किंवा वर्तनावरून पारखावयाचे असते, असे आमचे धर्मशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ मानतात. धर्म हा विषय व्यासपीठावरून उपदेश करण्याचा नाही किंवा ग्रथरूपाने लिहून ठेवण्याचा नाही; तर प्रत्यक्ष आचरणांत आणण्याचा तो विषय आहे. म्हणून आचार हा मुख्य धर्म आहे असे आपण मानतो. त्या आचाराचा परलोकापेक्षा ऐहिक व्यवहाराशीच जास्त संबंध आहे, असे थोड्या विचारांती आपल्या ध्यानीं येईल. अहिंसा, सत्य, अस्तेय, इंद्रियनिग्रह व मनःशुद्धि हे आपल्या आचारधर्माचे मुख्य ध्येय आहे.

## धर्म आचरणांत आला पाहिजे—

आपल्या आचाराची पहाणी केली असता त्यात अनेक गोष्टींचा मोठ्या कुशलतेनें समावेश केला आहे असे आपणास दिसून येईल. वर्षांतून अनेक सण आपण साजरे करतो. तसेच रोजच्या कार्यक्रमातहि अनेक नित्यकर्मांचा आपण समावेश करतो. नित्यकर्मातील सध्यावंदन, पूजा, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, गणेशाथर्वशीर्ष, आरतीच्या पठनानें, तसेच 'उपनयना' (मौंजीबंधन) सारख्या प्रासंगिक संस्कारानी आपल्या दैनंदिन जीवनापैकीं अगदी थोडा वेळ खर्च करून, हजारो वर्षांपूर्वींच्या वैदिक ऋषींचा आणि त्यांच्या ग्रंथाचा संबंध आपल्या आचारविचाराशीं आपण कायम ठेऊं शकतो. अगणित द्रव्य खर्चून उभारलेल्या ग्रथशाळा, मनोवेधक महालें, किंवा साम्राज्यसत्तेच्या जोरावर उभारलेली स्मारकें यांनी जे काम होऊं शकत नाहीं, ते केवळ धार्मिक योग्यता आणि भावना यांच्या जोरावर प्राचीन ऋषिमुनींनी घडवून आणलें आहे. हजारो वर्षांची ही आचारधर्माची परंपरा ज्वलंत आणि जागृत ठेवणें हे प्रत्येक सुबुद्ध आणि सुपुत्र पुरुषाचें कर्तव्य आहे. नित्यकर्मसंग्रहाचें नित्यपठन आणि संस्कारविधींचे

卐 卐

# संस्काराचें महत्त्व

वैदिक धर्मांत धार्मिक नित्यकर्मे आणि संस्काराना अत्यंत महत्त्व दिलेलें आहे. धार्मिक नित्यकर्मे आणि संस्कार घेतल्यानें माणसाला विशेष प्रकारची योग्यता प्राप्त होते आणि तो खराखुरा मनुष्य बनतो. आपल्या मनावर, इंद्रियावर आणि शरीरावर सतत संस्कार करून त्याना योग्य प्रकारचें उत्कृष्ट कार्य करण्यास समर्थ ठेवणें हा धार्मिक नित्यकर्म आणि संस्कारांचा मुख्य उद्देश आहे. हा उद्देश सिद्धीस जावा म्हणून आपल्या धर्मात अनेक नित्यकर्म आणि संस्कार सांगितलेले आहेत. काल बदललेला असला तरी या नित्यकर्मांचें आणि संस्काराचें महत्त्व आपल्या मनात पूर्ण ठसलेलें आहे. आजच्या प्रतिकूल कालातही त्यापैकी कांहीं नित्यकर्म आणि संस्कार मोठ्या आग्रहानें चालू असल्याचें दिसतें. याचें कारण नुसतें गतानुगतिकत्व नसून अशा संस्काराची आवश्यकता आमच्या मनात रुजलेली आहे हें होय.

## संस्काराचें सातत्य

धार्मिक नित्यकर्मे आणि संस्काराची आवश्यकता सृष्टीतील वस्तुमात्राकडे पाहण्यानें सहज पटण्यासारखी आहे. वस्त्र धुवावें लागतें, भांडें घासावें लागतें, आणि घराची झाडसारवण केली नाहीं तर लागलीच तेथील प्रसन्नता नाहींशी होते. सोन्यामोत्याचा अलंकार आणि निमळ वस्तूला मुद्दाम झिलई देऊन ते अधिक डोळ्यात भरेल अशी व्यवस्था करावी लागते. धार्मिक नित्यकर्म आणि संस्कार म्हणजे तरी दुसरे काय आहे ? दोष नाहीसे करून गुण वाढविणें, मंदपणा घालवून तरतरीतपणा उत्पन्न करणें, स्फूर्ति देऊन ध्येयवादाची प्रेरणा देणें हाच धार्मिक नित्यकर्म आणि संस्कारांचा मुख्य उद्देश आहे. आरशावरचे धूळकण

रोज पुसून काढावे लागतात, तेव्हा तो स्वच्छ राहतो. माणसाच्या मनाची सुद्धा अगदीं अशीच स्थिति आहे. दर क्षणी त्यावर अनिष्ट परिणाम होत असतात. 'मनो दुर्निग्रह चलम्' असा त्याचा लौकिक आहे. त्याला नियमाच्या कचाट्यात, पकडून निग्रहाचा धाक दाखवून, चांगल्या संस्काराना ध्येयवादाकडे प्रेरित करणें आवश्यक असते.

## वैदिक नित्यकर्म व संस्कार

याकरिता वैदिक धर्मात कांहीं नित्यकर्म आणि संस्कार सांगितले आहेत संध्या, वैश्वदेव वगैरे नावानीं ते आपणास परिचित आहेत. चार नित्यकर्म आणि सोळा संस्कार म्हणून ते आपण ओळखीत असला तरी ते तितकेच आहेत असे समजण्याचे कारण नाहीं उपनयन, विवाह, अन्त्येष्टि वगैरे संस्कार तर आपल्या नित्य व्यवहारात अपरिहार्यच मानतात. परंतु जन्मापासून अनेक संस्कार आप त्यावर होत असतात. आपलीं गृह्य व श्रौतकर्में आपल्या संस्कारातच अन्तर्भूत होतात. वैश्वदेवासारख्या पाकयज्ञापासून, यज्ञाच्या मोठमोठाल्या प्रकाराचाही आमच्या धार्मिक नित्यकर्म आणि संस्कारातच समावेश आहे. त्या लहान मोठ्या संस्काराच्या द्वारा आम्ही आमच्या मलिन होणाऱ्या ध्येयवादाला उजाळा देऊन आमची ध्येयदृष्टि जागती ठेवीत असतो.

आमच्या सामाजिक संघटनेला पायाभूत असणाऱ्या अहिंसा, सत्य, अस्तेयादि महान् तत्त्वांची उपासना करण्याचे काम आम्ही या धार्मिक नित्यकर्म आणि संस्काराच्या द्वाराच करीत असतो. त्याचप्रमाणे सामाजिक ऋणाच्या महान् तत्त्वाचे बीजारोपण आम्हीं या धार्मिक नित्यकर्म आणि संस्काराच्या द्वाराच समाजातल्या प्रत्येक माणसापर्यंत पोचविण्याची व्यवस्था करतो या दृष्टीनें उपनयन संस्कारानंतर अत्यावश्यक मानल्या गेलेल्या वैश्वदेव ब्रह्मयज्ञ आदि धार्मिक नित्यकर्मांचे अवलोकन करणें उपयुक्त होईल. व्यक्तीपुरती स्वार्थी भावना सोडून सामाजिक दृष्टी उत्पन्न करणें हाच आमच्या संस्कारांचा उद्देश असून त्यांनीं ध्येयवाद सतत ताजा ठेवण्याचा त्यांत प्रयत्न आहे

## ध्येयवादाची निष्ठा उत्पन्न करणें हे धर्माचें मुख्य कार्य

मनुष्य जन्मानें शूद्र असतो. पण त्याला संस्कारानीं द्विजत्व प्राप्त होतें. या देहांत विद्येची भर पडली तर त्याला खरा ब्राह्मण म्हणायचें. असा हा जन्म,

संस्कार आणि विद्या यांच्या समुच्चयाने होणारा पुरुष आदर्श म्हणून समाजापुढे आम्हाला ठेवावयाचा आहे.

संस्काराचे महत्त्व आधुनिक शिक्षणशास्त्रानेहि मान्य केलेले आहे प्राचीन कालापासून आधुनिक शास्त्रापर्यंत, संस्कारांनी माणसाच्या मनाला विशेष प्रकारच्या अपरिवर्तन आकार देता येतो याबद्दल मतभेद नाहीत हे संस्कार फक्त धर्मानं सांगितलेले आहेत तेवढेच असेहि समजण्याची चूक कोणी करू नये धार्मिक संस्कार हे फक्त प्रतीक म्हणून मानलेले असतात आपल्या जीवनातील महानमोठी प्रत्येक हालचाल हा एक संस्काराचाच भाग आहे घरातील असो किंवा समाजातील असो, राजकीय असो किंवा व्यावहारिक असो, आपली वागणूक, बोलणे, चालणे हे आपल्या संस्कृतीचे निदर्शक असतात आणि त्याचा परिणाम आपल्या भोवतालच्या लोकांवर होत असतो हे जाणून आपण व्यवहार केला पाहिजे संस्काराचे स्वरूप इतके व्यापक आहे की स्त्री पुरुष, उच्च नीच असा भेद याबाबत नाही सर्वांनाच संस्काराची म्हणजे ध्येयवादाच्या निष्ठेची अत्यंत आवश्यकता आहे

## शालेय संस्काराचे महत्त्व

शाळेतील प्रार्थना ध्वजवंदन, परिपाठाचा एकत्रपणा आसनव्यवस्थापद्धति या व्यवहारांतील अगदी साध्या दिसणाऱ्या पद्धतींना सुद्धा संस्काराच्या दृष्टीने अत्यंत महत्त्व आहे त्यांतील एकरूपता आणि अनुशासन यांची योग्य जोपासना करून आणि योग्य मानसिक वळण देऊन ध्येयवाद जागृत ठेवण्याच्या कामात आपण फार मोठी कामगिरी करीत असतो हे प्रत्येकाने ध्यानात धरावे

पुष्कळ वेळा जुन्या दिसणाऱ्या साध्यासाध्या संस्कारांतील प्रखरता कमी झालेली आढळते तेव्हा त्या संस्कारांना आधुनिक रूप देऊन त्यांत चैतन्य उत्पन्न करावे लागते कांही वेळा तर नाविन्याचे आकर्षण लक्षात घेऊन नव्या नव्या संस्कारांचाहि आचार सुरू करावा लागतो यांतील उद्देश एकच असतो तो म्हणजे माणसाच्या मनांत ध्येयवाद जागृत करून त्याला सुसंस्कृत आणि आदर्श नागरिक बनवणे हा होय पुढील प्रगतीचा मार्ग आक्रमण करण्यास उत्तेजन देणे आणि अशा रीतीने मनुष्यप्राण्याला देवत्वाप्रत नेणे हे आपले ध्येय आहे

# नित्यकर्माचें धार्मिक शिक्षणांतील स्थान

## जन्मापासून शाळेंत जाण्यापर्यंत

लहान मुलाच्या शिक्षणाला सुरुवात अगदीं लहानपणापासून होते. शाळेस जाण्यास सुरवात करणे म्हणजे आपण शिक्षणाचा प्रारंभ मानतों. मुलाचा जन्म झाल्यानंतर आईबापांना जितका आनंद होतो, तितकाच मुलगा शाळेंत जावयास निघाल्यानंतर होतो. आयुष्याचा एक टप्पा पुरा होऊन दुसऱ्या टप्प्यास येथून सुरुवात होते. शाळेंत जाण्यास सुरुवात करणें म्हणजे अगदीं नव्या आयुष्याला सुरुवात होते.

उपनयन अथवा मुंज म्हणजे शिक्षणाला प्रारंभ करण्याचा समारंभ होय. उपनयनांत समारंभपूर्वक मुलाला गायत्रीमंत्र शिकविला जातो. त्याच्या शिक्षणाचा हा आरंभ होय. म्हणूनच उपनयनसमारंभ हा मुलाला व घरच्या लोकांना अत्यंत महत्त्वाचा वाटतो. आपलें धर्मशास्त्रसुद्धां उपनयन म्हणजे दुसरा जन्म असें मानतें.

पहिला जन्म म्हणजे आईच्या उदरांतून बाहेर येणें. जन्मल्यापासून शिक्षणाला आरंभ होईपर्यंत एक जन्म, त्यानंतर पुष्कळच शिक्षणाचा भाग असतो. चालायला लागणें, बोलायला लागणें वगैरे क्रमाने प्रगति करीत मुलाचें व्यावहारिक ज्ञान वाढत जातें. हळू हळू त्याला अनेक वाक्यें बोलतां येऊं लागतात. लोकांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तो देऊं लागतो. शब्दसंग्रह वाढत वाढत त्याचे पाठांतरही सुरू होतें. त्याला अधिक शिक्षण देण्याची आवश्यकता भासते. घरचें शिक्षण संपतें. कोणा तरी जाणत्याकडून अधिक शिक्षणाची आवश्यकता भासते. येथ त्याचा बाहेरच्या जगाशीं संबंध सुरू होतो.

प्रगतीच्या मार्गास लागतो. अशा वेळीं त्याच्या प्रकट होणाऱ्या गुणांचे सारखें कौतुक करावें लागतें. त्याच्यातील सुप्त असणाऱ्या गुणांना जागृत करून त्याचे गुण वाढवावे लागतात.

## आशावाद निर्माण करणें हें शिक्षण

घर हें शिशूचें प्राथमिक स्थान असलें तरी जग हें शिक्षणाची खरी शाळा होय. शाळा व लोकव्यवहार यांतून अनेक प्रकारचें शिक्षण माणसाला मिळतें. अवलोकनानें माणसांतील विशेष गुण जागृत होऊन व्यक्त होऊं लागतात. व्यक्त होणाऱ्या गुणांना उत्तेजनाची सतत जरूर असते. शिक्षणाचें मुख्य काम उत्तेजन देऊन सुप्तगुण जागृत करणें आणि माणसाला आशावादी बनविणें हें आहे.

## धार्मिक शिक्षणावर जोर

साक्षरता हा शिक्षणाचा एक भाग. तो व्यवहारापुरता मर्यादित आहे. त्यापेक्षा माणुसकीला आवश्यक असणाऱ्या गुणांची जोपासना करणें हा शिक्षणाचा दुसरा महत्त्वाचा भाग होय. शिक्षण म्हणजे साक्षरता एवढाच अर्थ आपण सध्या ध्यानांत घेतों. पण त्यापेक्षा मनाला सुसंस्कृत करून माणुसकी निर्माण करणें यासाठीं आपण दुर्लक्ष होतें. धार्मिक शिक्षणात मुख्यतः साक्षरतेपेक्षा धार्मिक शिक्षणावर अधिक जोर दिलेला असतो.

आपल्या जुन्या धार्मिक आचारांत त्या शिक्षणाचा सहजपणें समावेश केलेला आहे. सकाळ संध्याकाळ प्रार्थना, स्तोत्रपाठ, भजन वगैरे गोष्टींची मांडणी या दृष्टीनें पाहाण्यासारखी आहे. या आचारांचाच नित्यक्रम म्हणतात. नित्यक्रमांत संध्या, पूजा वगैरे गोष्टी पाळल्या नसतां यांचा प्रत्यय येतो. हें शिक्षण जाहेर सिद्ध करून नाहीं. तें तात्पुरतें नसून कायमच परिणामकारक असतें. आपल्या मनाला कायमचें बंधन म्हणून त्याचा स्वीकार करावा लागतो. तें वळण जन्मभर टिकेल असा प्रयत्न करावयाचा असतो. प्रत्यक्ष व्यवहारात तें उतरावें लागतें. असें मनाला मिळालेलें विशेष प्रकारचें शिक्षण याला 'धर्मशिक्षण' असें म्हणतात.

## धर्मशिक्षणाची आवश्यकता

तें 'धर्मशिक्षण' आपल्या परंपरेंत कसें बसविलेलें आहे, त्याकरितां कोणते नियम पाळावयास सांगितलेले आहेत, हे मुद्दाम पहाण्यासारखे आहे. आजच्या काळांत शाळेंत इतके विषय झाले आहेत कीं, त्यांना धर्मशिक्षण देण्यास सवडच नाहीं. अशा परिस्थितींत हा धार्मिक शिक्षणाचा भाग हा अनाथासारखा बाजूस पडलेला आहे. गृहसंस्था नष्ट झाली. म्हणून गृह-शिक्षण गपुष्टात आलें. आचारविचार पाळतां येईनासे झाले आणि समाज-संस्था ही अस्थिर झालेली आहे. जागतिक झंझावातांत धर्मशिक्षणासारखा माणुसकी निर्माण करणारा महत्त्वाचा विषय अनावश्यक ठरत आहे. त्यामुळें समाजाचा पायाच नष्ट होतो आहे कीं काय असें वाटतें. या विषयाचें महत्त्व यामुळें अधिकच वाढलेलें आहे. त्याशिवाय तरणोपाय नाहीं याबद्दल शंका नाहीं. धार्मिक नित्यकर्म आणि संस्कार यांचे या नव्या दृष्टिकोनांतून अध्ययन करण्याची वेळ आज आलेली आहे. हा नवा दृष्टिकोन 'मौजीबंधना' च्या सीमारेषेवर उभ्या असणाऱ्या कुमारांच्या मनावर ठसवणें, हा प्रस्तुत छोटेखानी पुस्तकाचा प्रमुख उद्देश आहे.

卐 卐

उपनयन झाल्यानंतर विद्याग्रहणाचे सामर्थ्य प्राप्त व्हावे म्हणून हा 'मेधा जनन' नावाचा विधि करतात. एक पळसाच्या पादीची पूजा करून हा विधि पूर्ण होतो.

卐 卐

## बुद्धीची उपासना

### बुद्धीला प्रेरणा देणारा मंत्र

उपनयनात बुद्धीची आराधना प्रामुख्याने अनुस्यूत आहे. गायत्रीमंत्र हा बुद्धीला प्रेरणा देण्याची प्रार्थना करणारा मंत्र आहे. उपनयनाच्या शेवटी मेधा म्हणजे बुद्धि मिळण्याचीच प्रार्थना आहे.

'माझी स्मरणशक्ति तीव्र असावी, मला चांगले ज्ञान व्हावे, मी उत्तम विषयप्रतिपादन करावे, मला उत्तम बुद्धी प्राप्त व्हावी' अशी या मंत्रात प्रार्थना करण्यात आली आहे.

### बुद्धीचे प्रकार

बुद्धीचे अनेक प्रकार आहेत. मेधा, प्रज्ञा, बुद्धि असे वेगळाले प्रकार बुद्धीचेच आहेत. ते असले तरच विद्या संपादन करता येईल. लोकांना आपल्या ज्ञानाने चकित करिता येईल आणि सर्व प्रकारचे मान सन्मान व ऐश्वर्य घर चालत आपल्याकडे येईल हे लक्षात घेऊन आपल्या नित्यकर्मांची व संस्कारांची मांडणी केलेली आहे असे दिसते.

### बुद्धी दे रघुनायका

समर्थ रामदासांना सुद्धा रामाजवळ धनदौलत मागितली नाही, राज्य मागितले नाही, किंवा केवळ कृपेची भीकही मागितली नाही. या सर्व गोष्टी बुद्धीने सहज मिळतात, असा त्यांचा दृढ विश्वास होता. म्हणून समर्थांनी सुद्धा रामाजवळ 'बुद्धि दे' अशी प्रार्थना केली आहे. समर्थ म्हणतात —

युक्ति नाहीं, बुद्धि नाहीं, विद्या नाहीं विवचिता ।
नेणता भक्त मी तुझा, बुद्धि दे रघुनायका ॥
बोलता चालता येना, कार्यभाग कळेचिना ।
बहु मी पीडिलों लोकीं, बुद्धि दे रघुनायका ॥
रामदास म्हणे माझा, संसार तुज लागला ।
सदाय वाटतो पोटी, बुद्धि दे रघुनायका ॥

卐 卐

## 'संध्या' म्हणजे उपासना

आपल्या घरगुती आचारात अत्यंत महत्त्वाचा भाग उपासनेचा होय. प्रत्येकान रोज सकाळ-मध्याकाळ देवाची उपासना केलीच पाहिजे, असा नियम आहे. मग ती उपासना देवाचें नाव घेऊन केलेली असो, हरिपाठासारखे अभंग म्हणण्याची असो, किंवा गायत्रीमंत्राच्या जपाची असो. प्रत्येकान अशी उपासना केलीच पाहिजे असा नियम आहे प्रत्येक घरात याप्रमाणे उपासना चालू असते. हिलाच जुन्या ग्रंथात 'संध्या' असे म्हणतात. ही संध्या नावाची देवाची उपासना सकाळ संध्याकाळ करावयाची असते

### संध्या कोणी करावी

या संध्येचा प्रारंभ मुलाची मुंज झाल्याबरोबर होतो साधारणत मुलाच्या वयाच्या आठव्या वर्षी मुंज करण्याची पद्धत आहे मुलगा आठ वर्षांचा झाला की, त्यानें प्रत्यहि सकाळ संध्याकाळ संध्या म्हणजे उपासना केलीच पाहिजे घरातील प्रत्येक माणसान उपासना करावयाची असते कारण उपासनेन होणारा फायदा जो उपासना कराल त्यालाच व्हावयाचा असतो. जेवण हें जसे प्रत्येकाला आवश्यक आहे तशीच उपासनाहि प्रत्येकान केली पाहिजे

### 'संध्या' विधीचा अल्प परिचय

आपल्या संध्येस आचमनापासून आरंभ होतो केशवादि चोवीस देवाचीं नावे प्रथम घातली जातात नंतर प्राणायाम करून श्वासोच्छवास स्वच्छ केला जातो.

आपला निरोगीपणा व काम करण्याची शक्ति ही केवळ त्याच्या सामर्थ्यावर अवलंबून आहे. म्हणून त्याच्या स्वच्छतेची नेहमी दक्षता घेतली पाहिजे. या स्वच्छतेचे मुख्य साधन पाणी होय. म्हणूनच ते सर्वांना मुबलक व मोफत मिळावें अशी सृष्टीची रचना आहे.

## जलाचे महत्त्व

हे जलाचे महत्त्व मार्जनाच्या मन्त्रात उत्तम ग्रथित केलेले आहे. पाण्याला मार्जनाच्या मन्त्रात 'शिवतमो रस' 'अत्यंत कल्याणकारक' असे म्हटलेले आहे. 'उशतीरिव मातरः' मातेप्रमाणे जल प्राण्याचे संगोपन करते. हे जलाचे महत्त्व उपयुक्त मन्त्रात गायलेले आहे.

याशिवाय पुढील मंत्र पहा :—

> अपो याचामि भेषजम् ।
> अप्सु मे सोमो अब्रवीद् अन्तर्विश्वानि भेषजा ।
> आपः पृणीत भेषजम् ॥

'हे जलदेवतांनो, तुम्हाला मी शरीरपोषक द्रव्यें मागतो. मला सोमानें सांगितले आहे की, तुमच्यात सर्व औषधी द्रव्यें आहेत. मला तुम्ही तीं पोषक द्रव्यें द्यावीत.' पाण्याचें आरोग्यदृष्ट्या असलेले महत्त्व या मन्त्रात अगदी साध्या शब्दांनी सांगितलें आहे.

卐 卐

## 'उपस्थान' म्हणजे प्रार्थना

संध्येंत उपस्थान म्हणजे प्रार्थनेचा एक भाग महत्त्वाचा आहे. या प्रार्थनेत तीन मंत्र दिलेले आहेत. पहिल्यामध्ये अभीष्टाची प्रार्थना आहे. दुसऱ्यात सर्वांचे कल्याणाची प्रार्थना असून तिसऱ्यात सर्व देवतांना नमस्कार आहे.

पहिल्या 'जातवेदसे' या मन्त्रात, पाण्यांतून नौका ज्याप्रमाणे पैलतीराला सुखरूप पोहोंचविते त्याप्रमाणे सर्व संकटांतून तू आम्हांला पार कर अशी प्रार्थना आहे.

दुसऱ्या 'तच्छया' या मंत्रात आरोग्याची तसेच आम्हा सर्वांचे कल्याण असावें अशी प्रार्थना आहे

तिसऱ्या 'नमो ब्रह्मणे' या मंत्रात सर्व सृष्टीत व्यापून असणाऱ्या परमेश्वराला नमस्कार केलेला आहे ब्रह्म, अग्नि, पृथ्वी, औषधी, वाणी, वाचस्पति व विष्णू या सर्व व्यापक असणाऱ्या देवतांना नमस्कार करून हे उपस्थान संपले आहे

## पृथ्वी हे कार्यक्षेत्र

नंतर केल्या जाणाऱ्या दिग्वंदनात सर्व दिशा व त्यांचे अधिपति यांना नमस्कार केलेला आहे सर्व पृथ्वीभर व्यापून असणाऱ्या परमेश्वराला नमस्कार पोचावा, अशी प्रार्थना करून हा संध्यारंभाचा विधि समाप्त होतो

## जपानें देवता शरीरात प्रवेश करतात

या संध्यावंदनात आचमन प्राणायाम, संकल्प, मार्जन, अघमर्षण, अर्घ्य प्रदान, आसनादिविधि, न्यास, ध्यान जप, उपस्थान, दिग्वंदन व अभिवादन असे छोटे छोटे लहान भाग असले तरी त्यात आचमन, प्राणायाम, अर्घ्य व जप हे मुख्य विधि होत त्यांतही गायत्री जप हा मुख्य असून जप करण्याला मनाची तयारी करण्याकरिता बाकीचे विधि आहेत हे सहज ध्यानात येण्यासारखे आहे

संध्याविधि करण्यास पाच सात मिनिटांपेक्षा जास्त वेळ लागत नाही या करिता लागणारी साधनेही सहज उपलब्ध होण्यासारखी आहेत स्नान करून धूत वस्त्र नेसल्यावर थोडे स्वच्छ पाणी घेऊन हा विधि करिता येतो मुख्य कृत्य जप जर त्याला तर मानसिक एकाग्रतेशिवाय काहीच साधन लागत नाही. मानसिक एकाग्रता मात्र सहज प्राप्त होण्यासारखी नसते मनाची तयारी करून एखाद्या गोष्टी ध्यास घेऊन मनाची एकाग्रता करावी लागते तशी तयारी करून शुद्ध जागी मन एकाग्र करावें लागते नंतरच हा जप होऊ शकतो.

जप हा संध्येचा मुख्य भाग होय, त्याला एकाग्रतेशिवाय दुसरे कोणते बाह्य साधन लागत नाही जपाने सर्व देवता सामर्थ्यासह आपल्या शरीरात प्रवेश करतात

## 'पूजा' म्हणजे सगुण उपासना

मध्या ही उपासना असली तरी ती निर्गुणाची उपासना होय. निर्गुणाची उपासना श्रेष्ठ प्रतीची असली तरी सर्वांना ती सहज साधते असे नाहीं. म्हणून सगुण उपासनेचाहि आपल्या नित्यकर्मात समावेश केलेला आहे. सगुण उपासना म्हणजे मूर्तिपूजा. ही सर्वांना समजण्यासारखी असते. म्हणून तिचा आचार करणे सोपे जाते, पूजा म्हणजे मूर्तिपूजा होय.

मूर्ति कोणत्या देवाची घ्यावी ? असा नेहमीं प्रश्न उत्पन्न होतो. एकाचा अभिमान धरला असता दुसऱ्या संबंधीं अनादराची भावना उत्पन्न होते. तशी स्थिति आपल्या मूर्तिपूजेची नाहीं. सर्व सृष्टींत परमेश्वर भरला असून तो अनेक रूपानें नटलेला आहे. त्यापैकीं कोणतेहि प्रतीक आपण पूजेकरितां स्वीकारावें. कोणत्याहि देवाची पूजा केली तरी ती परमेश्वराला पोहोंचते, असा आपला विश्वास आहे.

### पूजेतील उपचार

ह्या पूजा करण्याचा प्रकार मात्र ठरलेला आहे. नमस्कार करण्यापासून अनेक उपचार समर्पण करण्यापर्यंत तो बांधलेला आहे. 'यथा देहे तथा देवे,' असा या संबंधाचा सामान्य नियम आहे. आपल्या शरिराला जे उपचार आवश्यक वाटतात तेच देवालाहि अर्पण केले तर देव प्रसन्न होतो, असा या संबंधाचा मुख्य विचार आहे.

केवळ नमस्कार, गंधपुष्प वाहणे, धूपदीप समर्पण करणें, नैवेद्य दाखविणें, विडादक्षिणा देणे, सुगंधी द्रव्य समर्पण करणे, वगैरे उपचार बाढवीत, पुष्पा र्पणेंत सुद्धां पूजेतच समाविष्ट होत. जे विधि रोज करतां येत नाहींत ते विशेष विधि सणावारीं किंवा उत्सवप्रसंगीं केले जातात. या पद्धतीनें अगदीं नमस्कारा पासून अनेक उपचार, समारंभपूर्वक, वाजंत्री लावून, नाचगाणीं करीत देवाला समर्पण करण्याची पद्धत आहे. हा सर्व उपासनेचा प्रकार पूजा या पद्धतींत मोडतो. अशा पूजेने देवताविषयक विचार जागृत होतात आणि देवता संबंधी सूक्ष्म विचार करण्याची मनाची तयारी होते. हा या विधींचा मुख्य फायदा होय.

## पूजेची जागा

आपल्या पूजाविधींत अतर्बाह्य निर्मळपणाचा मुख्य भाग आहे. यालाच शुद्धता किंवा पवित्रपणा असें म्हणतात. देवाच्या पूजेची जागा म्हणजे देवघर स्वतंत्र असावें. त्या जागीं कमालीची स्वच्छता असावी तेथ चांगला उजेड असावा. जमीन असल्यास सारवलेली, रांगोळी वगैरे घालून सुशोभित केलेली असावी. फरशी असल्यास ती स्वच्छ पुसलेली, डाग वगैरे नसलेली असावी तेथ पायतण वगैरे घालून जाऊ नये. उष्ट्य,खरकट्याचा संबंध तेथें असता उपयोगी नाहीं. जळीजळमटें होऊं देऊं नयेत. मुंग्या, माशा वगैरे कीटक तेथ न होण्याची खबरदारी घ्यावी. तेथील बसण्याचा पाट, आसन, पूजेची पात्र इतर कोणत्याहि कामाला वापरू नयेत. अशी एकदर पूजेच्या जागेची व्यवस्था असावी.

पूजासाहित्यहि आपल्या शक्तीप्रमाणें घेतलेलें असले तरी तें स्वच्छ, ताजें आणि मनाला प्रसन्न करणारें असावें. देवाचें वस्त्र देवाकरिताच वापरलें जावें. गंध, फूल, नैवेद्य, हे प्रथम देवाला समर्पण करुन नतर इतरांनी वापरावे. अशुद्ध पदार्थांचा सपर्क पूजेशी कधीच येता उपयोगीं नाहीं. देव व देवाचें साहित्य आणि जागा यांची विशेष स्वच्छता करण्याचा आठ पंधरा दिवसांत एखादा दिवस ठरवावा व त्याप्रमाणें तेथील व्यवस्था, मांडणी व स्वच्छता मनाला प्रसन्न करणारी राखण्याचा प्रयत्न करावा.

## देवतांना प्रिय वस्तु वाहाव्यात

माणसाप्रमाणें, देवाचीही मर्जी राखावी लागते. आपल्या घरातील लोकांची मनें सांभाळण्याचा आपण जसा प्रयत्न करतो, तसेंच देवाच्या बाबतींतही आपलें वागणें असलें पाहिजे. सगळ्यांची मर्जी राखणें हाहि देवपूजेचाच एक प्रकार आहे.

उदाहरणार्थ गणपतीला दुर्वा, विष्णूला तुलसीपत्र, देवीला हळदीकुंकू, विठोबाला बुका, खंडोबाला भंडार, महादेवाला बिल्वपत्र प्रिय आहे, तर त त्यांना अर्पण केलें पाहिजे. त्यामध्यें आपली बुद्धि किंवा तर्क चालविण्यात अर्थ नाहीं.

तसेच फुलांचे रंग किंवा जाती, नैवेद्याचे प्रकार वगैरेंच्या ज्या रूढी आहेत, त्या तशा पाळण्याचा कटाक्ष ठेवला पाहिजे.

## उपासनेतील समानता व व्यापकता

दानधर्म करणे, अन्नछत्र घालणे, पाणपोया उघडणे, अनाथ अपंगांना साहाय्य करणे, पूजेकरिता फुलेंतुळशी वगैरे उपचार प्राप्त व्हावेत म्हणून उद्याने उभारणे, या सर्वांचा देवाच्या पूजेतच समावेश होतो. दानधर्म केल्याशिवाय पूजा यथासांग होत नाही. अन्नदान हाहि पूजेचाच एक भाग आहे. कोणतीही पूजा दक्षिणा वगैरे दिल्याशिवाय पुरी होत नाही. असा हा उपासनेचा मोठा व्यापक प्रकार आहे

यात स्त्रीपुरुष, अज्ञानसज्ञान, उच्चनीच या सर्वांचा समावेश करून घेता येतो. ध्यानादि उपासना व्यक्तिनिष्ठ आहेत. त्यात सर्वांचा समावेश करणे कठीण पडते. पण हा सगुण भक्तीचा प्रकार सर्वसमावेशक असून सामुदायिक होऊ शकतो. त्यामुळे सर्व साधुसंतांनी या पूजेच्या प्रकाराचा पुरस्कार केलेला आहे.

卐 卐

शिजविल्या अन्नाचा वैश्वदेव करणे शक्य न झाल्यास कच्च्या तांदुळानीहि वैश्वदेव करण्याची पद्धत आहे.

卐 卐

## सामुदायिक जीवन

या वैश्वदेवात एक महान् तत्त्व सांगितलेलें आहे. आपण जें अन्न शिजवितो त आपल्या एकट्याच नसत. त्यात देव, ऋषि, व पितर, फार काय आपल्या भवतीं असणारे पशुपक्षी यांचाही वाटा आहे. त्या सर्वांना संतुष्ट करूनच आपण अन्नभक्षण करावयाचे असते. रस्त्याने जाणाऱ्या भुकेल्या पाहुण्या चाही अतिथियज्ञाच्या रूपानें त्यात समावेश आहे. आपलें जीवन हें व्यक्तिनिष्ठ नसून सामुदायिक आहे, सर्वांना संतुष्ट ठेविलें तरच आपल्याला चांगलें येईल; असा त्यामध्ये सिद्धान्त ग्रथित केलेला आहे.

### सहकार्याशिवाय जीवन अशक्य

भगवद्गीतेतही या सिद्धान्ताचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. भगवद्गीतेत म्हटलेलें आहे कीं, जे स्वतःकरिताच फक्त अन्न शिजवितात, ते पापी लोक नरकाला जातात. तो श्लोक असा —

> यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।
> भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ (भ. गी. ३.१३)

यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या भागाचें ग्रहण करणारे सर्व पापांतून मुक्त होतात पण यज्ञ न करतां केवळ आपल्यासाठीच जे अन्न शिजवितात ते पापी होत. ते अन्नभक्षण करीत नाहीत तर पापच भक्षण करतात.

वैश्वदेवाचा सकलमुद्दा या दृष्टीनें पाहण्यासारखा आहे. पांच प्रकारची हिंसा केल्याशिवाय माणसाला एक घासहि खातां येत नाहीं. कांडणें, दळणें, पाखडणें, चूल पेटवणें, अन्न शिजवणें व पाणी आणणें ही अन्न तयार करताना कराशी लागणारीं कृत्यें करतांना इतर प्राण्यांना व जीव जंतूंना थोडी तरी पीडा झाल्याशिवाय राहत नाहीं. हा दोष नाहीसा व्हावा म्हणून अन्नग्रहणापूर्वी नित्य

वैश्वदेव करावयाचा असतो. 'पंचसूना दोषपरिहार्य,' असा वैश्वदेवाचा संकल्प आहे. वैश्वदेव केल्याशिवाय अन्नाला शुद्धताच मुळी येत नाहीं, असें आपलें धर्मशास्त्र सांगतें.

### एकटे खाऊ नका

झाडाला पाणी घालून त्याची जोपासना करावयाची आणि मग त्यापासून सहज मिळणारें फलपुष्प घ्यावयाचें. गाईला देवासारखें पूज्य मानून तिची सेवा करावयाची, तिला गोग्रास अर्पण करावयाचा; आणि नंतर तिचें सहज मिळणारें दूध वगैरेंचा उपयोग करावयाचा असा हा साधा विचार आहे.

आपलें जीवन अत्यंत अपूर्ण आहे. अनेकांनी आपल्याशी सहकार्य केलें तरच या जगात जीवन कंठणें शक्य आहे. ज्यांच्यावर आपलें जीवन अवलंबून आहे, त्यांशी अविरोधानेंच नेवळ भागत नाहीं; तर कृतज्ञतेनेंच आपणास वागलें पाहिजे, हा धडा वैश्वदेवाचा नित्यकर्मांत समावेश करून देण्यात आला आहे. हाच धडा वैश्वदेवानें दिला जातो.

क्षुद्र कृमिकीटकापासून तें थेट बारा वाजता अन्नाची अपेक्षा करणाऱ्या अतिथीपर्यंत सर्वांना आपल्या शक्तिप्रमाणें अन्नदान केलेंच पाहिजे कर्तव्य म्हणून केलें पाहिजे. हे शिक्षण वैश्वदेवानें सहज मिळतें.

卐 卐

## 'ब्रह्मयज्ञ' म्हणजे ज्ञानाची अखंड उपासना

ज्ञानाची परंपरा व उपासना अखंड चालविण्याकरितां ब्रह्मयज्ञ आहे. पंच-महायज्ञांपैकीं ब्रह्मयज्ञ हा पांचवा महायज्ञ होय. देव, भूत, पितृ आणि अतिथि हे चार यज्ञ वैश्वदेवात समाविष्ट आहेत. या पांचव्या ब्रह्मयज्ञात ज्ञानाची पूजा आहे. ब्रह्म म्हणजे वेद किंवा ज्ञान, यज्ञ म्हणजे पूजा. वेदाची पूजा गंधफूल वाहून करावयाची नसते. प्रत्यक्ष वेदाशी परिचय करून घेणें ही वेदाची पूजा होय. साक्षात् वेदाशी परिचय, वेदाचे सुप्रसिद्ध संशोधक व अभ्यासक यांचें स्मरण, आणि ही ज्ञानगंगा आपल्यापर्यंत आणून पोचवणारे आपले पूर्वज यांना वंदन याचा ब्रह्मयज्ञात समावेश आहे.

## प्रयत्नांचे ऋण

पहिल्या भागात आपल्या वर्गातील आरंभाची वाक्ये म्हटलीं जातात. त्यात वेदाच्या सहा अंगाच्या प्रारंभीची वाक्येंसुद्धा समाविष्ट आहेत कारण स्मृतिवाक्य, शास्त्र, यांच्या आरंभाचाहि त्यात समावेश आहे. ऋषि, मुनि, आचार्य, साधुसंत यांना संतुष्ट करावयाचे म्हणजे त्यांची पुण्यतिथि साजरी करावयाची नाही. त्यांना संतुष्ट करावयाचे म्हणजे त्यांनीं लिहिलेले ग्रंथ स्वतः शिकून पुढल्या पिढीला ते शिकवावयाचे. अशी परंपरा निर्माण करून ज्ञानात सारखी वाढ करीत राहावयाचे परंपरा अखंड ठेवून शिष्यप्रशिष्यांच्या द्वारा राष्ट्र व संस्कृति अमर करण्याचा संदेश 'प्रजाभिरग्ने अमृतत्वम् अश्याम्', या ऋग्वेदातील मंत्राने दिलेला आहे (ऋ. ५.४.१०) हा मंत्र प्रत्यही वैश्वदेवात अग्नीची प्रार्थना करण्याकरिता म्हणण्यातहि येतो

## ज्ञानदात्याचे उपकार

असा यथाशक्ति वेदपठणाचा भाग झाल्यानंतर देव, ऋषि, आचार्य व पितर यांना त्यांची नावे घेऊन पळीभर पाणी देण्याचा तर्पणाचा भाग आहे त्यात वेदमंत्राचा तपश्चर्येने शोध लावणारांपासून, वेदाच्या संरक्षणाची व्यवस्था करणाऱ्या ऐतिहासिक ठळक स्त्रीपुरुष व्यक्तींचा समावेश आहे आचार्यतर्पणात क्रियांचाहि समावेश आहे महाभारतादि आपल्या अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या सांस्कृतिक ग्रंथकारांपासून आपल्याला आपल्या या श्रेष्ठधर्माची दीक्षा देणाऱ्या आपल्या कुळातील मातापित्यापर्यंत सर्वांचे नामग्रहणपूर्वक तर्पण करण्याची ब्रह्मयज्ञात व्यवस्था आहे

वैश्वदेवांतील धर्मविधि अवघ्या प्राणिसृष्टीशी कनवाळूपणाने वागून सहकार्याचा संदेश देणारा आहे. ब्रह्मयज्ञातील सर्व भाग ज्ञानोपासनेला महत्त्व देणारा आहे असा प्रकारे पंचमहायज्ञानी देव, ऋषि, आचार्य, संतमहंत, मनुष्य, प्राणिमात्र व ज्ञान यांच्यासंबंधी आपल्या कर्तव्याची जाणीव आपणास दिली आहे

आपण सर्व सहकार्यानेच आपले आयुष्य यशस्वी करू शकतो लहानथोर, उच्चनीच, गोरे काळे मनुष्यांत हा मुद्दा भेद न ठेवता अहिंसावृत्तीने,

" एकमेका सहाय्य करू अवघे धरू सुपंथ, " असे आपण वागल्याशिवाय तरणोपाय नाहीं.

या अहिंसेच्या, सत्कार्यांच्या आणि सर्वांना योग्य भाग देऊन जगण्याच्या कल्पनेला ज्ञानसंपादनाचा व ज्ञानोपासनेचा भक्कम पाया असला पाहिजे, असे ब्रह्मज्ञान आपल्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न आहे. ही सर्व सामाजिक जबाबदारी पत्करण्याकरितां करावयाच्या संस्कारास उपनयन संस्कार म्हणतात लोकांत मुंज या नांवानें तो प्रसिद्ध आहे.

卐 卐

## सूर्य नमस्कारांचें महत्त्व

शरीराला आरोग्य लाभावें म्हणून सूर्याला रोज बारा तरा नमस्कार घालावेत, कारण, सूर्य हा आरोग्य देणारा देव आहे त्याला नमस्कार घातल्यानें रोगराई होत नाहीं; शरीर कांतिमान् राहात म्हणून सूर्याची उपासना आपल्या रोजच्या आचारामध्ये सांगितलेली आहे तसेंच बुद्धि व ऐश्वर्य प्राप्त व्हावें म्हणून आपण प्रत्येक कार्याच्या आरंभी गणपतीचें स्मरण करतों व रोज गणपतीचें स्तोत्र म्हणतो.

आपलें आयुष्य सुखासमाधानानें जावें, आपणास आरोग्य लाभावें आणि विद्या व ऐश्वर्य मिळविण्याची महत्त्वाकांक्षा कायम टिकावी, हा अशा उपासनांचा महत्त्वाचा उद्देश आहे.

-:- -:-

शतं जीव शरदो वर्धमानः, शतं हेमन्ताञ्छतमु वसन्तान्
शतमिन्द्राग्नी सविता बृहस्पतिः, शतायुषा हविषेमं पुनर्दुः ॥ (ऋ. १०.१६१.४)

तुझा सारखा उत्कर्ष होत रहावा आणि तूं शंभर वर्षे ऐश्वर्य भोगावेस. इंद्र, अग्नि, सविता आणि बृहस्पति या देवांची तूं उपासना करावीस; त्या देवता तुला आणखी शंभर वर्षे आयुष्य देवोत.

## उपनयन संस्काराची पार्श्वभूमि

*ब्रह्मचर्येण तपसामृतमश्नुते ।*

उपनयन संस्कार हा बाल्यावस्था संपून विद्यार्थिदशा सुरू करण्याचा समारंभ आहे. हा ब्रह्मचर्याश्रमाचा प्रारंभ होय. गुरूकडून मंत्राचा उपदेश घेऊन या आश्रमाला सुरुवात होते. मंत्राबरोबर देवतेची उपासनाहि सुरू होते. आकाशातील सूर्य आणि पृथ्वीवरील अग्नि या उपासनेच्या देवता आहेत. गायत्री मंत्राने सूर्याची उपासना सुरू होते. होमहवन करून अग्नीची उपासना केली जाते. अग्निकार्य पुढे प्रसंगविशेषी होते, पण मंत्राचा जप मात्र नित्य करावा लागतो. हा वैदिक धर्माच्या दीक्षेचा समारंभ होय.

दीक्षेत मंत्र असतो, त्याप्रमाणे विशेष प्रकारचा वेषहि असतो ब्रह्मचाऱ्याचा वेष प्राचीन कालापासून ठरलेला आहे. हरणाचें कातडे, लंगोटी वगैरे वस्त्र, लंगोटी नेसण्यास कमरेला दोरी, गळ्यात जानवें व हातात दंड, असा हा ब्रह्मचाऱ्याचा प्राचीन गणवेश उपनयनात समारंभाने देण्यात येतो. पाण्याकरिता ताम्याभांडे देण्यात येते.

### उपनयन संस्काराचें धार्मिक महत्त्व

प्राचीन हिंदु धर्मात एकंदर सोळा संस्कार मानण्यात आले आहेत. यापैकी उपनयन, विवाह आणि अंत्येष्टी हे तीन संस्कार सर्वात प्रमुख आणि अपरिहार्य मानण्यात आले आहेत. उपनयनाआधी करावयाचें गर्भाधानापासून चौल म्हणजे शेंडी ठेवण्यापर्यंतचे आठ संस्कार महत्त्वाचे खरे, परंतु ते सर्वच लोक

करतात असे नाही. ही अडचण लक्षात घेऊन हे उच्च संस्कार न करण्याबद्दलचे प्रायश्चित्त प्राचीन धर्मशास्त्रात सांगण्यात आले आहे, आणि तसे प्रायश्चित्त उपनयनावेळीच्या अगोदर उरकण्याची सोयहि धर्मशास्त्रात करून ठेवण्यात आली आहे.

## चौल संस्काराचा लोप

चौल म्हणजे शेंडी ठेवण्याचा संस्कार सध्या उपनयनातच अन्तर्भूत करण्यात आला आहे, आणि सामान्यतः तो उपनयनाबरोबरच करण्यात येतो. अनेक प्रसंगी चौलसंस्कारहि मुळीच न करता प्रायश्चित्ताच्या चार आहुति देऊन तो उरकण्यात येतो आणि एकदम उपनयन करण्यात येते.

उपनयनाचे वय लांबत गेल्यास चौलसंस्काराचे महत्त्वहि रहात नाही. तो एक देहसंस्कार असल्याने बहुधा तो स्वाभाविक रीत्याच होत असतो. तरी देखील उपनयन समारंभाच्या वेळी एक लौकिक विधि म्हणून तो करण्याची पद्धत आजहि दिसून येते.

उपनयनापासून अन्त्येष्टीपर्यंतचे आठ संस्कार धर्मशास्त्रात अपरिहार्य मानले आहेत. त्यातल्या त्यात उपनयन संस्काराचे महत्त्व बदलत्या समाजस्थितीतहि टिकून आहे.

## उपनयनोत्तर अन्य संस्कार

उपनयन संस्कारानंतर करावयाचे असे महानाम्नी, महाव्रत, उपनिषद्व्रत व गोदानव्रत असे चार व्रतरूप संस्कार धर्मशास्त्रात सांगण्यात आले आहेत. उपनयनानंतर करावयाचे वेदाध्ययनच आज रद्द झाले आहे. त्यामुळे वेदाध्ययनाचे चार प्रमुख टप्पे म्हणून सांगण्यात आलेले हे उपनयनोत्तर चार संस्कार आज संपूर्णतः बंद पडले आहेत.

हे चारहि संस्कार प्रायश्चित्तरूपाने समावर्तन संस्काराचे (सोडमुंजीचे) वेळी करण्याची पद्धत काही वर्षांपूर्वी रूढ होती. परंतु समावर्तन म्हणजे विद्याध्ययन संपवून घरी परत येण्याचा संस्कारहि आज संपुष्टात आला आहे. या संस्काराचे महत्त्व आज नाहीसे झाले असून, तो विवाहापूर्वी करतात. उरकण्याची प्रथा आज रूढ झाली आहे.

अशा तऱ्हेनें प्राचीन सोळा संस्कारांपैकीं उपनयन, विवाह आणि अंत्येष्टी हे तीनच संस्कार समाजांत सध्या जीव धरून आहेत. यांपैकीं विवाह आणि अंत्येष्टी हे देहविधि या दृष्टीनें अपरिहार्य आहेत. त्यामुळें संस्कार या दृष्टीनें केवळ उपनयन संस्कारच आज जीवितावस्थेत आहे असे म्हणावें लागतें.

## उपनयन संस्काराचें खरें मर्म

उपनयन संस्कारानें आपण ब्रह्मचर्याश्रमाचा स्वीकार करीत असतों. ब्रह्मचर्य म्हणजे काय, त्याचें महत्त्व काय, ब्रह्मचर्यावरच आपल्या भावी आयुष्याची यशस्विता कशी अवलंबून असते, ह्या गोष्टी ह्या संस्कारानें मुलाच्या मनावर बिंबवल्या पाहिजेत. सध्यां चालू असलेल्या संस्काराचें स्वरूप ह्या हेतूच्या अगदीं विरुद्ध आहे. नव्हे त्या गोष्टींना भलतेंच महत्त्व देण्यात येत आहे. अक्षत, भिक्षावळ, बोहलें, मंडप, वही, घाणा वगैरे दिखाऊ भागाना महत्त्व देऊन बटूच्या मनावर आपण भलताच परिणाम सध्या घडवून असतो. त्यापेक्षाहि वाईट गोष्ट म्हणजे अशी कीं, मुंजीच्या मंडपातच त्या मुलाच्या लग्नाच्या गोष्टी बायका बोलूं लागतात; आणि मुलाच्या मनावर संस्कार करतात कीं, उपनयन म्हणजे लग्नाची पूर्वतयारी आहे.

## ब्रह्मचर्याचें पालन

सर्व उत्तेजक गोष्टींपासून विद्यार्थ्याला अलिप्त ठेवून त्याचें शरीर व इंद्रियें सुदृढ करणें व त्याला कोणतेंहि महत्त्वाचें कार्य करण्यास धैर्य व उत्साह वाटेल अशी वाढ करणें हा सर्व आयुष्याचा पाया आहे. आणि हा पाया वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत भरावयाचा असतो. त्या वेळीं ज्यांनी आपल्या शरीराची जोपासना केली नाहीं, त्यानीं पुढील आयुष्याचा नाश करून घेतला असें निश्चित समजावें.

नाटकं, सिनेमा, कादंबऱ्या, चहा, कॉफी, धूम्रपान ह्या गोष्टी ब्रह्मचर्याच्या मुळावर घाला घालणाऱ्या आहेत. ह्या गोष्टी मुलाच्या दृष्टीसहि पडता उपयोगी नाहींत. पालक आणि शिक्षकांनीं या गोष्टींकडे अत्यंत लक्ष दिलें पाहिजे.

व्यायाम सक्तीचा करून धर्माचें व नीतीचें शिक्षण शक्य त्या प्रकारें दिलें पाहिजे, आणि मुलाच्या मनावर ब्रह्मचर्याचें महत्त्व बिंबवून ब्रह्मचर्याच्या

-सरणाकरता वाटेल त करावयास तयार असण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न व्हावयास पाहिजे.

## उपनयन संस्कारातील डामडौल

याकरिता या संस्कारातील अशास्त्रीय व डामडौलाचा सर्व भाग एकदम नाहीसा केला पाहिजे. ब्रह्मचर्याचे नियम, विद्या व शरीरसंपत्ति इकडे मुलाचें लक्ष वेधले पाहिजे. पूर्वीच्या काळीं ब्रह्मचर्याचे नियम पाळण्यास सध्यासारखी अडचणीची स्थिति नव्हती. शहरांतील राहणी, तसेंच सर्व तऱ्हेच्या उत्तेजक प्रकारांपासून अलिप्त अशा ठिकाणीं अत्यंत साध्या राहणींत बरीच वर्षें राहण्याची व्यवस्था असल्यानें सहजच ब्रह्मचर्याचे नियम पाळले जात. परंतु सध्या त्याच्या अगदीं उलट स्थिति आहे. त्यामुळें राहणी, खाणें, पिणें, पोषाख, वगैरे बाबतींत कडक निर्बंध असणें अत्यंत जरूर आहे. पूर्वी गुरुकुलासारखी व्यवस्था असूनहि पोषाख वगैरेंच्या बाबतींत कडक निर्बंध होते, मग सध्या त्याची किती जरूरी आहे हें सांगणें नको.

## समारंभाचे गांभीर्य

जेवणावळी, वाजंत्री, पोषाख, देवघेव वगैरे मोठ्या लोकांच्या हौसेच्या गोष्टीमुळें मुलाच्या मनावर योग्य परिणामाऐवजीं अनिष्ट परिणामच घडून येतो. वास्तविक हा मुलाचा संस्कार आहे पण त्याचें विस्मरण झाल्यासारखे लोक वागतात व स्वतःचें ऐश्वर्य प्रगट करून कृतकृत्यता दाखविण्याकडे त्याचा उपयोग केला जातो.

वास्तविक उपासना म्हणा, वेदाध्ययन म्हणा, किंवा आरोग्य म्हणा या दृष्टीनें फार मोठी जबाबदारी सध्या आपल्यावर येऊन पडली आहे. ती निभावण्याचें सामर्थ्य उत्पन्न व्हावें व नवा आयुष्यक्रम सुरू व्हावा, असा या संस्काराचा परिणाम झाला पाहिजे.

## आदर्श उपनयन समारंभ

साधा, सुविहित, सुस्थितीत असा हा समारंभ असावा. नव्या आयुष्याच्या स्वीकाराची जाणीव त्यांत स्पष्ट असावी. स्वतंत्र आयुष्याला नियमबद्धता उत्पन्न झाली आहे हें या समारंभानें लक्षांत यावें. हा पुनर्जन्म यशस्वी व्हावयाचा

असल्यास रडतर अभ्यासक्रम आणि कमालीचे कष्ट करण्याची मनाची तयारी झाली पाहिजे. हा या संस्काराचा परिणाम अपेक्षित आहे

卐 卐

## उपनयन संस्कार व त्याचा विस्तार

सध्या आपल्या समाजात जे धार्मिक संस्कार भिक्षुकांकडून करण्यात येतात ते आपणास अवजड वाटतात त्यात निरर्थक भाग कोणता आणि प्रधान भाग कोणता याची ओळख संस्कार करणाऱ्याना नसते त्यामुळे करावयाचा तर साग्र, नाहीतर अजिबात नाही अशी स्थिति होते ही स्थिति शास्त्र व भावना ह्या दोनाही दृष्टींनी अयोग्य होय

### उपनयन संस्कारातील फापटपसारा

साधारणत जुना प्रयोग चालविण्याबद्दल विचार करू लागल्यास, असे दिसून येते की, आवश्यक कृत्य आणि अनावश्यक कृत्य, गौण व मुख्य कृत्य, प्रधान व अंग यातील भेद संस्कार करणाऱ्याला समजत नाही यामुळे धर्म कृत्याच्या मुळावरच घाला पडून साधक या सर्वच कृत्यापासून परावृत्त होण्याचा प्रयत्न होऊ लागतो वास्तविक कर्मप्रवृत्त व्हावे हा ह्या सर्व धर्म कर्माचा उद्देश व परिणाम असावयास पाहिजे याच्या उलट स्थिति उत्पन्न होऊ लागल्यास आपल्या प्रमादस्थलाची पाहणी आपण केली पाहिजे. कर्माचा साधकाच्या मनावर अनुकूल परिणाम होऊन त्याजकडून ध्येय म्हणून ठरविलेल्या गोष्टी साध्य झाल्या पाहिजेत तीं कर्मे करण्याविषयी याची मनोवृत्ति अनुकूल झाली पाहिजे कर्म करून टाकणे, उरकून टाकणे, ओरबडून टाकणें, ही वृत्ति उपयोगी नाही ती वृत्ति उत्पन्न होत असल्यास कुठे फरफार करावयास पाहिजे, असे का होते हे कळले पाहिजे, आणि तो भाग सुधारला पाहिजे त्यात वैरस्य उत्पन्न न होईल अशी व्यवस्था करून शास्त्रीय प्रधान कर्म मनोबोधक होईल असे केले पाहिजे

## उपनयन संस्कारांतील तीन महत्त्वाचे विधि

उपनयन संस्कार केल्याने बटूस वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त होतो. तसेच वैदिक धर्मात सांगितलेली धर्मकृत्यें करण्याचाहि अधिकार प्राप्त होतो. या कारणाने सान्या सोळा संस्कारात उपनयन संस्कार सर्वात श्रेष्ठ समजला जातो.

या संस्कारात मुख्यतः तीन धार्मिक विधि समाविष्ट करण्यात आलेले आहेत. या विधींचे स्वरूप थोडक्यात खालीलप्रमाणे आहे --

### १. गायत्रीमंत्राचा उपदेश

अत्यंत अल्पाक्षरी परंतु बहुगुणी अशा या मंत्राचा आचार्यद्वारें मुंजामुलास करण्यात आलेला उपदेश, हा उपनयन संस्कारातील सर्वांत महत्त्वाचा धार्मिक विधि होय. हा मंत्र आणि त्याचा अर्थ खाली दिल्याप्रमाणे आहे --

ॐ भूर्भुवः स्वः । ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य
धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ।

[ जो सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो, त्याच्या श्रेष्ठ व पापनाशक तेजाचे आम्ही ध्यान करतो ]

प्रणव आणि व्याहृति अगोदर सांगून झाल्यानंतर, गायत्रीमंत्राचा प्रथम चरण, मग अर्धा मंत्र आणि शेवटी सर्व मंत्र आचार्य बटूस सांगतात. या पद्धतीने मंत्र म्हणण्यास बटू असमर्थ असला तर त्याला जसा म्हणता येईल तसा तो त्याच्याकडून म्हणवून घेतात.

### २. अंजलिक्षारण

उपनयनामधील प्रधान होम झाल्यानंतर 'अंजलिक्षारण' नावाचा धार्मिक विधि कुमाराच्या परिनयनार्थी आणि सवितृदेवतेच्या तृप्तीसाठी करण्यात येतो. आचार्य आपल्या ओंजळीतील पाणी शिष्याच्या ओंजळीत टाकावयाचे आणि नंतर ते पाणी शिष्याच्या ओंजळीतून खाली जमिनीवर पडू द्यावयाचे या विधीस अंजलिक्षारण असे म्हणतात.

अग्निप्रदक्षिणा विधीमध्ये बटूस अग्नि व सूर्य यांच्या शिष्यत्वाची दीक्षा देण्यासाठी आचार्य त्याचा अंगुष्ठासहित हात आपल्या हाती घेतो आणि खालीलप्रमाणे मंत्र म्हणतो.—

ॐ सविता ते हस्तमग्रहीत ।

[ सविता ( रूप मी ) तुझे हात ग्रहण करितो. ]

ॐ अग्निराचार्यस्तव ।

[ अग्नि रूप मी तुझा हात ग्रहण करितो ]

ॐ देव सवितरेष ते ब्रह्मचारी तं गोपाय समामृत ।

[ हे प्राणिमात्राला उत्पन्न करणाऱ्या तेजस्वी सूर्यदेवा, हा ब्रह्मचारी तुला रक्षण करण्यास योग्य आहे. म्हणून त्याचे रक्षण कर त्याला मरण प्राप्त न होवो ]

## ३ आचार्यद्वारा बटूचें मुखावलोकन

या विधीची सुरुवात मंगलाष्टक सपल्यावर आणि अंतरपाट दूर झाल्या नंतर उपदेश देण्यासाठी आचार्य प्रथम बटूचे मुखावलोकन करतात, तेव्हा होते यानंतर बटू आचार्यास नमस्कार करतो आणि मग आचार्य त्यास प्रथम आपल्या मांडीवर बसवून, नंतर त्यास स्वत चे उजव्या बाजूस बसवतो

卐 卐

आपणास काळजी घेतली पाहिजे. ' सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डितः '। या न्यायाने अंगोपांगाकरिता प्रधानकर्म टाकण्याची वेळ येत असेल तर अंगोपांगें टाका, प्रधान कर्म सोडू नका, असेच धोरण जुन्या शास्त्रकाराचेही आहे, आणि ते पुढे चालविण आपले कर्तव्य आहे. लोकांना कर्माला प्रवृत्त केले पाहिजे, तें कर्मांपासून निवृत्त होतील असे धोरण पत्करून आपण कर्ममार्गाच्या नाशाला कारण होता उपयोगी नाहीं.

## उपनयनसंस्कार सुटसुटीत कसा होईल ?

सध्या रूढ असणाऱ्या उपनयनप्रयोगाचा विचार पूर्व व उत्तरांग वाढल्यामुळे झालेला आहे. उपनयनाला अंगभूत असणारे हे आधीचे व मागाहूनचे विधि बरेच लांबलचक व अवजड झालेले आहेत. पण ते सर्व गौण व अनावश्यक आहेत. त्यामुळे मुख्य विधि कोणता आणि गौण कोणता या संबंधी भ्रम उत्पन्न होतो. मुख्य विधीकडे दुर्लक्ष होऊन गौण विधीकडे अधिक लक्ष येथल जाते ही गोष्ट अत्यंत अनिष्ट आहे. म्हणून मुख्य विधीकडे लक्ष वेधण्याकरिता गौण विधि दूर सारण्यास हरकत नाहीं. तरच मुख्य विधीचें महत्व मनावर ठसणार आहे.

'आधारवं तंत्र' असे म्हणतात. याचे उलट पूर्वांग उत्तरांग अशा पद्धतीने जे होमहवन अत्यंत थोड्या वेळात उरकता येते त्यास 'आपूर्विक' अथवा 'वैश्वदेवादिकतंत्र' असे म्हणतात. यापैकी 'आधारवतंत्रा'मध्ये पात्रासादन वगैरेचा बराच मोठा पसारा घालावा लागतो. त्यामध्ये वेळ आणि पैसाहि पुष्कळ खर्च होतो. अशा स्थितीत वैश्वदेवादिक तंत्राचा अवलंब करून आणि वैश्वदेवातल्या प्रमाणें अग्नीची प्रार्थना करून होमहवन करणें कमी खर्चाचे आणि कमी श्रमाचे करण्यासारखे आहे.

卐 卐

## कांहीं गौण विधी

### घाणा भरणें

मध्याच्या उपनयन प्रयोगात घाणा भरणें वगैरे काही लौकिक विधींना महत्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. वास्तविक घाणा भरणे म्हणजे सर्वकार्याची तयारी झाल्यावर उखळ, मुसळ, वगैरे व्यवस्थित बांधून बाजूस ठेवणे. आज घरांतील उखळ, मुसळ व जाते बाजारात जाऊन बसलें आहे. पूर्वी ही सर्व तयारी घरीं केली जात असे. आजच्यासारख्या गायत्री व नातेवाईक स्त्रिया त्या करिता झटत असत. म्हणून त्या समारंभाला महत्व होते. आता तें पूर्ण नष्ट झाले आहे. म्हणून या लौकिक, आचारिक विधीची बिलकूल गरज नाहीं.

### मंडपप्रतिष्ठा

मंडपप्रतिष्ठा नावाचा एक धार्मिक विधि यासिवाच्या मार्फत, एका सुपात सुपाऱ्या वगैरे मांडून बऱ्याच विस्तारानें केला जातो. पण तो विधीहि अगदी निर्जीव झाला आहे. मांडव न घालता मंडपाच्या खांबखळग्या भागावर स्थापन करावयाच्या देवता सुपांत मांडून ठेवावयाच्या ही गोष्ट अगदी थट्टास्पद आहे. तसेच पूर्वांगात व उत्तरांगात अनेक ल्हान मोठे विधी शिरले आहेत. ते परिस्थितीनें निरुपयोगी होऊन आपोआपच व्यवहारांतून गळत आहेत. आम्ही फक्त ते सर्व प्रकार गाळावत आणि मुख्य उपनयन संस्काराकडे लक्ष वधावें असा उपदेश म्हणतो इतकेंच.

# उपनयनाविषयक कांही मुद्द्यांचें शंकासमाधान

## उपनयनाचा काल

प्रत्येक वर्णाच्या लोकांना उपनयनाचा काल वेगळा सांगितला आहे. आठ, अकरा व बारा अशा क्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना काल सांगितलेला आहे. अनुक्रमें सोळा, बावीस व चोवीस वयाच्या पुढें तरी उपनयन संस्कार राहतां उपयोगी नाहीं (आश्व. गृह्यसूत्र. १.१९). मुलाच्या वयाच्या आठव्या वर्षापासून चोवीस वर्षांपर्यंतचा काल हा उपनयनाचा काल असें ठरते.

यापुढें जर उपनयन न होता राहण्याचा प्रसंग आला तर ही गोष्ट शास्त्रानें अत्यंत निंद्य मानली आहे. तथापि त्याचाही प्रायश्चित्त सांगितलेले आहे. तें प्रायश्चित्त करून उपनयन केल्यास दोष नाहीं.

ज्ञानवृद्धि व बुद्धीची जोपासना करून व्यासंग वाढवावयाचा असल्यास वयाच्या पांचव्या वर्षीसुद्धां उपनयन करण्यास शास्त्राची आज्ञा आहे. तात्पर्य पुढील आयुष्यांतील प्रगतीच्या दृष्टीनें शक्य तितक्या लवकर उपनयन संस्कार करून मुलाला नियमित वर्तन करण्याचें वळण लावणें हाच उपनयनाचा मुख्य उद्देश आहे.

## उपनयनाचा मुहूर्त

उपनयनाकरितां योग्य मुहूर्त पाहाण्याची आपल्याकडे पद्धत आहे. माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ हे महिने उपनयनास योग्य होत. वद्य पंचमीपर्यंतच पूर्ण चंद्र धरण्याची पद्धत असल्यानें महिन्याच्या वद्य पंचमीपर्यंतच उपनयनाचे मुहूर्त असतात. अपराह्णकाळीं मुंज करावयाची नसतें म्हणून दुपारच्या बारानंतर मुंजीचे मुहूर्त नसतात.

कालाच्या दृष्टीनें अनध्याय, कुयोग, जन्मनक्षत्र, जन्ममास, जन्मलग्न व जन्मस्थ चंद्र वर्ज्य करितात. गुरु-शुक्रांचा अस्त व राशीच्या अधिपतीची प्रतिकूलतादि ही उपनयनकालाला वर्ज्य आहेत. विशेषतः गुरु, चंद्र अनुकूल पाहून उपनयनाचा काल ठरवितात.

उपनयनाचा मुहूर्त गायत्रीमंत्राच्या उपदेशाच्या वेळेकरिता पाहावयाचा असतो. उपनयन हा दुसरा जन्म असल्यामुळें शक्य तितकी चांगली वेळ पाहून हा समारंभ घडविण्यात येतो पुढले आयुष्य सुखासमाधानाचें आणि ज्ञान प्राप्तीच्या दृष्टीने प्रगतीच जावें, म्हणून चांगला मुहूर्त पाहण्याची काळजी विशेषत. घेतली जाते. पण उपनयनाचे वय निघून गल्यावर मुहूर्ताची विशेष चिकित्सा करण्याचें कारण नाहीं. उपनयन झाले पाहिजे ही मुख्य गोष्ट. मुहूर्त चांगला साधल्यास ठीकच. गौण मुहूर्तावरसुद्धा उपनयन घडवून आणणें हा महत्त्वाचा भाग आहे.

## अधिकारी

उपनयनात गायत्रीमंत्राचा उपदेश हा मुख्य भाग होय गायत्रीमंत्राचा उपदेश करण्याचा मुख्य अधिकार पित्याचा. पित्याच्या अभावी, आजोबा वगैरे नात्याने वडील असणाऱ्याचा हा अधिकार आहे. तेही अशक्य असल्यास कोणाही श्रेष्ठ माणसाकडून किंवा आपल्या पुरोहिताकडून हा उपदेश घेता येतो.

## उपनयनानंतरचे कर्तव्य

उपनयन झाल्यानंतर काहीं व्रतें पाळावीं लागतात त्याचा उपदेश उपनयन संस्कारात गायत्री उपदेशानंतर व प्रथम अग्निकार्य झाल्यानंतर करण्यांत येतो. ते नियम असे --आपण ब्रह्मचर्याश्रम घतलेला आहे हें सतत ध्यानात धरून अंयत स्वच्छ राहावयाच, स्नान, भोजन वगैरेचे नियम पाळावयाचे, मूत्र विसर्जनानंतर स्वच्छता ठेवावयाची. उपासना वगैरे कर्में दक्षतेनें वेळच्यावेळीं करावयाचीं. दिवसा झोंप घ्यावयाची नाहीं गुरुकडे जाऊन ज्ञानसंपादन करावयाच हें व्रत बारा वर्षे किंवा शिक्षण संपेपर्यंत पाळावयाचें व स मानानें वागावयाच असे हे साधारण स्वच्छता, शिक्षण व मानसन्मानानें जगण्याचें नियम आहेत

# उपनयनासारखे इतर धर्मांतील संस्कार

## बौद्ध धर्मांतील प्रव्रज्या

बौद्ध धर्मात प्रव्रज्या व उपसंपदा असे दोन संस्कार अनुक्रमे आठ व वीस या वर्षी करण्यास सांगितले आहेत. ते गुरुगृही जाणें आणि उपसंपदा म्हणजे अध्ययन पुरे करून डोक्याची संपूर्ण श्मश्रु करितात आणि दशदीक्षापदानी म्हणजे दहा मंत्राचा उपदेश करितात.

## पारशी धर्मांतील नवजोत

पारशी लोकांचा नवजोत संस्कार हुबेहूब उपनयनासारखा आहे झरतुष्ट्राच्या धर्माची दीक्षा देण्याकरिताच हा संस्कार करितात त्यावेळीं एक सदरा, एक कटिबंध, व एक वस्त्र अशा तीन वस्तू देऊन विधिपूर्वक धारण करावयाच्या असतात हा संस्कार वयाच्या सातव्या वर्षी करावा असें त्यांच्या धर्मात सांगितले आहे. सदरा हा शब्दहि फारशीच आहे.

## इतर धर्मांतील संस्कार

मुसलमान वगैरे सेमेटिक राष्ट्रांत उपनयनाच्या तोडीचा संस्कार नाहीं. परंतु त्यांची सुंता करण्याची चालही बहुतेक उपनयनासारखी आहे.

खिस्ती लोकांत बाप्तिस्मा, कन्फर्मेशन आदि देईपर्यंत मुलास खिस्ती धर्माची दिक्षा प्राप्त झाली असे समजत नाही.

प्राचीन ग्रीक लोकांत वयांत येण्याचा संस्कार करीत. त्याचा हेतु बऱ्याच अंशी आपल्या उपनयनासारखा होता

प्राचीन रोमन लोकांत व्यक्तीगत संस्कार बहुधा नव्हते. सर्व धर्माधिकार राज्यकर्त्याकडे असत तेच नाना प्रकारचे राष्ट्रीय संस्कार करीत.

यावरून बौद्ध, पारशी या धर्मांत वयांत आल्यानंतर धर्माची दीक्षा देण्याचा विधि असल्याचे स्पष्ट दिसतो. खिस्ती लोकांतहि धर्मदीक्षेचा विधि आहे. इतरांच्या धर्मांत धर्मदीक्षेचे स्वरूप स्पष्ट आढळत नाहीं

## स्त्रिया आणि उपनयन

पूर्वीच्या काळीं स्त्रियांचें उपनयन होत असे, कलियुगांत स्त्रियांचें उपनयन बंद करण्यांत आले, उपनयनाच्या स्थानीं विवाह मानण्यात येऊं लागला. यावरून तात्पर्य हें निघतें कीं, जोपर्यंत प्रौढ विवाह चालू होता तोपर्यंत स्त्रियांना आवश्यक संस्कार म्हणून उपनयन करण्यात येत असावें. पण बालविवाहाची चाल ज्यसजशी समाजांत रूढ होत चालली तसा स्त्रियांच्या उपनयन संस्काराचे जागीं विवाह मानण्यांत येऊं लागला.

### स्त्रियांच्या उपनयनाची आवश्यकता

आधुनिक काळांत प्रौढ विवाह सुरू झाला आहे. अशा स्थितींत सज्ञान झालेल्या स्त्रियाना धार्मिक जबाबदारीची जाणीव म्हणून उपनयन करणें अत्यंत जरूर आहे. कोणताही धर्मविधि न झाल्यामुळें स्त्रियांची मनोवृत्ती स्वाभाविकरीत्या मोकाट असते. तिला ह्या संस्कारानेंच फक्त बंधन घालणे शक्य आहे. कायद्याच्या न्यायानें त्या धार्मिक होण्याची वाट पहात बसण्यापेक्षां सामाजिक नियमानें उपनयन रूढ करून याना वैदिकधर्माचे भागीदार करणें अत्यंत आवश्यक आहे.

म्हणून हिंदु पुरुषांप्रमाणें हिंदु-स्त्रियांचेंहि उपनयन करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. वारकरी सांप्रदायाशिवाय स्त्रियाना कोठें धार्मिकदृष्ट्या स्थान नाहीं. त्या सांप्रदायांत त्यांना माळ घालून आपली धार्मिक भावना तृप्त करतां येते. यापेक्षां विस्तृत क्षेत्राची जरूरी आहे. म्हणून स्त्रियांचेंही उपनयन व्हावें, असे मानणाऱ्या धर्मशास्त्रज्ञाचा एक मोठा वर्ग सध्या उत्पन्न होत आहे.

## उपनयन संस्कार बंद झाल्यास

पुष्कळ ठिकाणीं हा संस्कार बंद पडला आहे. क्षत्रिय-वैश्यांत तर तो पुष्कळच बंद पडला असून तो पुन्हां सुरू करण्याचे प्रयत्न फारसे यशस्वी झालेले नाहींत. ब्राह्मण लोकांतहि हा संस्कार नाममात्र शिल्लक आहे. कांहीं ठिकाणीं विवाहापूर्वी जानवें घालून कसातरी पार पाडण्यांत येतो. परंतु आचार

व वेदाध्ययन या दृष्टीनें त्याचें मूळ डळमळीत झालेलें आहे. तथापि जुन्या परंपरेंतील लोकांत तो अगत्यानें पाळण्याची प्रवृत्ती आहे. त्यामुळें जुन्या परंपरेचा धागा थोडा तरी पुढें सरकतो.

## उपनयन संस्कार बंद पडल्यास प्रायश्चित्त

उपनयन संस्कार तीन पिढ्या बंद पडल्यास चौथ्या पिढींत प्रायश्चित्त देऊन तो पुन्हां सुरू करतां येतो. याविषयीं जुन्या सर्व ग्रंथांचें एकमत आहे. कांहीं ग्रंथकारांच्या मतें बारा पिढ्यापर्यंतही हा संस्कार बंद पडला असल्यास तो पुन्हां सुरू करतां येतो, आणि कांहींच्या मतें केव्हांही प्रायश्चितपूर्वक हा संस्कार पुन्हां सुरू करतां येतो. वैदिक धर्मस्वीकाराचा हा विधि आहे असें एकदा ठरल्यास केव्हांही कोणत्याहि जातीच्या व धर्मांच्या माणसास हा संस्कार करून घेऊन वैदिक धर्म स्वीकारतां येईल. यासंबंधीचा अधिक विचार मूळ त्या त्या ग्रथांत पहाणेंच सोईचें होईल.

ही सर्व विचारसरणी लक्षांत घेऊनच गागाभट्ट यांनी श्रीशिवाजी महाराजांचें उपनयन त्यांना मुलेबाळे झाल्यावर महाराजांच्या चव्वेचाळीसाव्या वर्षी केलें.

卐 卐

# उपनयन प्रयोग

卐

## अनुक्रम

卐

(४) हृदयालंभन

(५) प्रथमाग्निकार्य

1. समिधासमर्पण,
2. अग्न्युपस्थान,
3. विभूतिग्रहण, विभूतिपूजन,
4. विभूतिधारण,
5. प्रार्थना

(६) गायत्री उपदेश

(७) दीक्षाप्रदान

1. मेखलाबंधन,
2. दंडप्रदान,
3. उपदेश
4. अग्निपूजन

(८) अनुप्रवचनीय होम

1. प्रधान होम

(९) मेधाजनन

1. संकल्प,
2. मेधा–सावित्री पूजन,
3. प्रदक्षिणा
4. मेधासूक्त जप

卐 卐 卐

# उपनयन प्रयोगः ।



## ( १ ) उपनयनपूर्वांग कृत्य

### १. लुप्तसंस्कार प्रायश्चित्त सङ्कल्प

उपनयनकर्ता—( सपत्नीक कृतनित्यक्रिय कृतमाङ्गलिकस्नानः स्वलङ्कृतो बद्धशिख द्विराचमेत् । पवित्रपाणिः प्राणानायम्य, इष्टदेवता गुर्वादींश्च नमस्कृत्य । देशकालौ संकीर्त्य । )

---

## ( १ ) उपनयनपूर्वांग कृत्य

### १. लुप्तसंस्कार प्रायश्चित्त सङ्कल्प

उपनयन संस्कार करणाऱ्यानें नित्यकर्म आटोपल्यानंतर तेल लावून ऊन पाण्यानें स्नान करावें व कपाळीं केशरी किंवा कुंकवाचें गंध लावावें. शेंडीला गांठ बांधावी व दोनदां आचमन करावें. पवित्रकें घालावीत. प्राणायाम करावा. इष्टदेवता, गुरु, आईबाप व ब्राह्मण यांस नमस्कार केल्यावर देशकालाचा उच्चार करावा. —

प्रायश्चित्त संकल्पकर्ता—मम उपनेतृत्वाधिकारसिद्ध्यर्थे कृच्छ्रत्रय-प्रायश्चित्त द्वादशसहस्रगायत्रीजप च करिष्ये ।

कुमार —( आचम्य ) मम कामचार-कामवाद-कामभक्षणादि दोषापनोदार्थं कृच्छ्रत्रय प्रायश्चित्त प्रतिकृच्छ्र तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयी-भूतनिष्कपादार्धपरिमितरजतद्रव्यदानेन ( अथवा ) प्रतिकृच्छ्र तत्प्रत्या-म्नायगोनिष्क्रयीभूतकार्षापणपरिमितताम्रमूल्यव्यावहारिकद्रव्यदानेन अहमाचरिष्ये ।

## २. कालातिपात-प्रायश्चित्त-संकल्प

कर्ता—अस्य कुमारस्य १ गर्भाधान २ पुंसवन ३ सीमन्तोन्नयन ४ अनवलोभन ५ जातकर्म ६ नामकरण ७ निष्क्रमण ८ अन्नप्राशन ९ चौलान्तानां नवसंस्काराणां कालातिपत्तिप्रत्यवायपरिहारद्वारा

---

प्रायश्चित्त संकल्पकर्ता—मला उपनयन संस्कार करण्याचा अधिकार प्राप्त होण्यासाठी मी तीन कृच्छ्र प्रायश्चित्त व बारा हजार गायत्री जप करीन.

कुमार-( केवल आचमन करून ) मला इच्छेस वाटेल तसें वागणें, इच्छेस वाटेल तसे बोलणे व इच्छेस वाटेल तसे खाणें वगैरे आचरण करण्यापासून उत्पन्न झालेल्या दोषांचे दूरीकरण होण्यासाठी मी तीन कृच्छ्र प्रायश्चित्त, किंवा त्याच्या प्रतिनिधीभूत रुप्याचे नाणें ( तीन रुपये ) किंवा तांब्याचें नाणें देऊन आचरण करीन.

## २. कालातिपात-प्रायश्चित्त-संकल्प

कर्ता—ह्या कुमाराच्या ( १ ) गर्भाधान ( २ ) पुंसवन ( ३ ) सीमन्तोन्नयन ( ४ ) अनवलोभन ( ५ ) जातकर्म ( ६ ) नामकरण ( ७ ) निष्क्रमण ( ८ ) अन्नप्राशन व ( ९ ) चौल ह्या नऊ संस्कारांचा कालातिक्रम झाल्याबद्दलचा दोष दूर होऊन श्रीपरमेश्वराची कृपा होण्यासाठी प्रत्येक संस्काराला 'ॐभूर्भुवः स्वाहा' असे म्हणून एक एक तुपाची आहुति व संस्काराचा लोप झाल्यामुळे संस्काराला

श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिमस्कार, ॐ भूर्भुवः स्वः स्वाहेत्येकैकयाहुतिं करिष्ये।

तथा—उक्तमस्काराणां लोपजनितप्रत्यवायपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिमस्कार पादकृच्छ्रं चौलस्य चार्धकृच्छ्रं प्रायश्चित्तं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतद्रव्यप्रदानं करिष्ये।

तथा च—अस्य कुमारस्य द्विजत्वसिद्ध्या वेदाध्ययनाधिकारसिद्ध्यर्थं उपनयनं करिष्ये।

कर्ता—( कृतमंगलस्नानमलंकृतं कुमारं मात्रा सह भोजयित्वा )

३ वपन, स्नान, तिलक

सकल्प—अस्य कुमारस्य उपनयनं कर्तुं तत्प्राच्यागभूत वापनादि करिष्ये। ( वपनं कारयित्वा, स्नापयित्वा, बद्धशिखं कुमारं मंगलतिलकं कुर्यात्। अत्र मौहूर्तिकं सत्कृत्य तदुक्ते शुभे मुहूर्ते आचार्यो वेद्यां प्राङ्मुख उपविश्य बटुं प्रत्यङ्मुखं स्थापयेत्। अन्तरा पटं धृत्वा

---

पादकृच्छ्र व चौलाबद्दल अर्धकृच्छ्र याप्रमाणे प्रत्यक्ष किंवा प्रतिनिधिद्वारा (द्रव्य वगैरे देऊन ) प्रायश्चित्त करीन

**कर्ता**--ह्यास द्विजत्व प्राप्त होऊन वेदाध्ययनाचा अधिकार उत्पन्न होण्यासाठी आज उपनयन संस्कार करीन.

३ वपन, स्नान, तिलक

( कर्त्याने अभ्यंगस्नान केलेल्या आणि अलंकृत केलेल्या अशा कुमारास आईचे सांगत जेऊ घालून आपणाजवळ बसवावे )

**सङ्कल्प**--ह्या कुमाराचे उपनयन करण्याकरिता त्याचे पूर्वांगभूत वपन करतो ( वपन करून, स्नान घालून, शेंडीला गाठ द्यावी. कपाळी कुंकुमतिलक लावावा यानंतर ज्योतिषाची संभावना, दक्षिणा, विडा देऊन पूजा करावी. आणि त्यांनी सांगितलेल्या शुभमुहूर्तावर आचार्याने वेदीच्या वर पूर्वेकडे तोंड करून बसावे आणि पश्चिमकडे तोंड करून बटूला उभे करावे

सुवासिन्यो मंगलाष्टकपद्यान् ब्राह्मणा मन्त्रांश्च पठेयुः । ततः आचार्यः कुमारं समीपमानीय तन्मुखं सम्यगीक्षेत । कृतनमस्कारं च तं स्वांके कुर्वीत । ततो वटुमाचार्यः स्वदक्षिणत उपवेशयेत् । )

卐 卐

## ( २ ) प्रधान होम

१. द्विजत्वसिद्धि

कर्ता--आचमनं प्राणायामः ।

संकल्प--अमुकशर्मणः कुमारस्य द्विजत्वसिद्धया वेदाध्ययनाधिकारार्थं उपनयनहोमं करिष्ये ।

२. अग्निकार्य

ततः समुद्भवनामानमग्निं गृहीत्वा स्थालीपाकतंत्रेण वैश्वदेवतंत्रेण

---

मध्यें अन्तरपट धरून सुवासिनींनीं मंगलाष्टकें[१] व ब्राह्मणांनीं मंत्र म्हणावेत. नंतर आचार्यानें त्या बटूस जवळ घेऊन त्याचें तोंड चांगल्या तऱ्हेनें निरीक्षावें. आणि स्वतःला नमस्कार करवून त्याला स्वतःच्या मांडीवर बसवावें. व नंतर त्याला आपल्या उजव्या बाजूस बसवावें. )

आचमन, प्राणायाम करावा.

卐 卐

## ( २ ) प्रधान होम

१. द्विजत्वसिद्धि

अमुक नांवाच्या कुमाराला द्विजत्व प्राप्त होऊन वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त व्हावा. म्हणून उपनयन होम करतों.

२. अग्निकार्य

स्थालीपाकतंत्रानें किंवा वैश्वदेवतंत्रानें पूर्वांग अग्निकार्य करून--

---

टीप--१ मंगलाष्टकें शेवटीं दिलीं आहेत. हा प्रकार लौकिक आहे.

वाग्निकार्यं कृत्वा)

२. वासोधारणम्

(कौपीनार्थं त्रिवृत कार्पाससूत्र कटावाबध्य कौपीन परिधाप्य) युव वस्त्राणि यस्य औचथ्यो दीर्घतमा, मित्रावरुणौ, त्रिष्टुभ्। वासोधारणे विनियोग।

ॐ युवं वस्त्राणि पीवसा वसाथे युवोरच्छिद्रा मंतवो ह सर्गाः। अवातिरतमनृतानि विश्व ऋतेन मित्रावरुणा सचेथे ॥ १ ॥

(इति मंत्रेण अहत शुक्ल वास परिधाप्य अन्येन काषायवाससा तेनैव मंत्रेण तथैव प्रावारेत्)

---

२ वासोधारण

लंगोटीकरता तिहेरी वळलेला कापसाचा दोरा कंबरेला बांधून लंगोटी घालावी. 'युव वस्त्राणि' ह्या मंत्राचा औचथ्य दीर्घतमा हा ऋषि, मित्रावरुण ही देवता, व त्रिष्टुभ हा छंद होय. वस्त्रधारणाकरिता उपयोग

'ॐ युव वस्त्राणि' (१) हा मंत्र म्हणून पांढरें वस्त्र नेसवून आणि त्याच मंत्रानें नवें पिवळें अंगावर घालवें

---

१ हे मित्रावरुणहो, तुम्ही चळकट वस्त्रें नेसता तुम्ही निर्माण केलेली सृष्टि मननीय व निर्दोष आहे तुम्ही सृष्टीला घातक असणाऱ्या गोष्टींचा नाश करा व सृष्टीच्या वाढीस कारण व्हा. (ऋ १.१५२.१)

४. अजिन-धारणम्

मित्रस्य चक्षुरित्यस्य वामदेवोऽजिनं त्रिष्टुप्। अजिनधारणे विनियोगः।

ॐ मित्रस्य चक्षुर्धरुणं बलीयस्तेजो यशस्वी स्थविरं समिद्धम्।
अनाहनस्यं वसनं जरिष्णु परीदं वाज्यजिनं दधेऽहम्॥ २॥
(इत्यजिनं धारयेत्)

५. यज्ञोपवीत-धारणम्

(ततो गायत्र्या दशकृत्वो मन्त्रिताभि-रद्भिरुपवीतं प्रोक्ष्य धारयेत्) यज्ञोपवीतमित्यस्य परब्रह्म ऋषिः, परमात्मा देवता, त्रिष्टुप् छन्दः। यज्ञोपवीतधारणे विनियोगः।

---

४. अजिनधारण

'मित्रस्य चक्षु' ह्या मंत्राचा वामदेव हा ऋषि, अजिन ही देवता आणि त्रिष्टुभ हा छंद होय. अजिन म्हणजे कातडे धारण करण्याकरता उपयोग.

'ॐमित्रस्य' (२) ह्या मंत्राने अजिन[1] म्हणजे कातडे धारण करावे.

५. यज्ञोपवीतधारण

(गायत्रीमंत्र दहा वेळा म्हणून अभिमंत्रित केलेल्या पाण्याने प्रोक्षण करून यज्ञोपवीत धारण करण्याकरिता पळीच्या हातात घ्यावे.) 'यज्ञोपवीत' या मंत्राचा परब्रह्म हा ऋषि, परमात्मा ही देवता आणि त्रिष्टुभ हा छंद होय. यज्ञोपवीतधारणाकडे उपयोग.

---

२. निर्मळ दृष्टि, स्थिरता, बल, तेज, यश, प्रौढता, उत्कर्ष, निर्वैर, आच्छादन, पातकनाश, व अन्न हे गुण या (हरिण) चर्मामध्ये आहेत. म्हणजे हे धारणाऱ्याला हे सर्व मिळतात. म्हणून मी अजिनधारण करतो (आ. गृ. सू. परिशिष्ट).

---

टीप–१ मग किंवा अजिन यापैकी एक कातडे हाती घालतो. अथवा दोनही घालण्याची चाल आहे.

ॐ यज्ञोपवीतं परमं पवित्रं प्रजापतेर्यत्सहजं पुरस्तात् ।
आयुष्यमग्र्यं प्रतिमुञ्च शुभ्रं यज्ञोपवीतं बलमस्तु तेजः ॥ ३ ॥
(इति मंत्रं वाचयित्वा दक्षिणबाहुमुद्धार्य उपवीतं धारयित्वा कुमारमात्मना अग्नेश्च मध्येन अग्नेरुत्तरभागं गमयेत् )

कुमार —आचमनम्—केशवायनम आदि ।
(पुनस्तथैवानीय स्वदक्षिणत उपवेश्य भूर्भुवः स्वः स्वाहेति प्रायश्चित्तस्य नवाहुतीर्दद्यात् ।)

## ६. प्रधान–होम

अग्न आयूंषीति तिसृणां शत वैखानसा ऋषयः, अग्निः पवमानो देवता, गायत्री छंदः । उपनयनप्रधानाज्यहोमे विनियोगः ।

---

ॐ यज्ञोपवीत० (३) हा मंत्र कुमाराकडून म्हणवून त्याचा उजवा हात वर करून त्यातून यज्ञोपवीत धारण करवावें.

मग आपल्या व अग्नीच्या मधून बटूला अग्नीच्या उत्तरेकडे आणून तेथें आचमन करवून पुन्हा तसें परत आणून आपल्या उजवीकडे बसविल्यावर 'भूर्भुवः स्वः' असें म्हणून प्राय श्चित्ताच्या नऊ आहुति द्याव्यात.

६. प्रधानहोम—

'अग्न आयूंषि' पासून क्रमानें तीन मंत्रांचें शतवैखानस हे ऋषि, पवमान अग्नि ही देवता, गायत्री छन्द, उपनयनकर्मातील प्रधान घृतहोमाकडे उपयोग

---

३. अत्यन्त पवित्र, प्रजापतीच्या सहवर्तमान उत्पन्न झालेलें, आयुष्य वाढविणारें आणि (सामर्थ्यामुळें) श्रेष्ठ असें यज्ञोपवीत आमच्या अज्ञानाचा नाश करो यज्ञोपवीत आमचें सामर्थ्य वाढविणारें आणि तेज वाढविणारें होवो.
(ब्रह्मबिंदूपनिषद्)

ॐ अग्न आयूंषि पवस आसुवोर्जमिषं च नः ।
आरे बाधस्व दुच्छुनां स्वाहा ॥ ४ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ॥
ॐ अग्निर्ऋषिः पवमानः पाञ्चजन्यः पुरोहितः ।
तमीमहे महागयं स्वाहा ॥ ५ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ॥
ॐ अग्ने पवस्व स्वपा अस्मे वर्चः सुवीर्यम् ।
दधद्रयिं मयि पोषं स्वाहा ॥ ६ ॥
अग्नये पवमानायेदं न मम ॥

---

'ॐ अग्न आयूंषि' (४) 'ॐ अग्निर्ऋषि.' (५) 'ॐ अग्ने पवस्वस्वपा' (६) हे तीन मंत्र म्हणून तुपाची आहुति छातीस डावा हात लावून प्रत्येक मंत्रानंतर समर्पण करावी व तीनहि वेळा 'अग्नये पवमानायेदं न मम' म्हणावें, म्हणजे पवमान अग्नीला ही आहुति समर्पण केली आहे. माझा भाग यांत नाही.

---

४. हे अग्ने, तू आमच्या आयुष्याचें रक्षण करतेस. बल व शरीर यांना पुष्ट करणारें अन्न उत्पन्न करावेंस आणि दुर्भिक्षादिकांना आम्हांपासून दूर करावेंस. (ऋ. ९. ६६. १९)

५. अशा मागणी आम्ही सर्वचक्षु, निषादादिक पंच-वर्णांना हितकारक असणारा आणि आपणापुढें सर्व प्रकारचीं धर्मकर्में करण्याकरतां स्थापन केलेला अशा ह्या महाधन अग्नीला करतो. (ऋ. ९. ६६. २०)

६. हे सुष्ठु कर्मे करणाऱ्या अग्ने, तू मला सामर्थ्योत्पन्न करणारें धन दे (ऋ. ९. ६६. २१)

प्रजापत इत्यस्य हिरण्यगर्भ प्रजापतिस्त्रिष्टुभ् उपनयनप्रधानाज्यहोमे विनियोग ।

ॐ प्रजापते न त्वदेतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां स्वाहा ॥ ७ ॥

प्रजापतये इद न मम ।

( अथाचार्य उत्तरतोऽग्ने प्राङ्मुखस्तिष्ठेत् । कुमारोऽग्न्याचार्ययोर्मध्येन गत्वाचार्याभिमुखस्तिष्ठेत् ।

卐 卐

---

' प्रजापते ' ह्या मत्राचा हिरण्यगर्भ ऋषि, प्रजापति देवता, त्रिष्टुभ् छंद, उपनयनांतील प्रधान घृतहोमाकडे उपयोग.

ॐ प्रजापते० ( ७ ) ' प्रजापतीस हें हवि दिलें माझे नव्हे असे म्हणून घृताची आहुति द्यावी.

नतर अग्नीच्या उत्तरेस पूर्वेकडे तोंड करून आचार्यानें उभे रहावे आणि कुमारानें अग्नि व आचार्य याच्या मधून जाऊन आचार्याकडे तोंड करून उभे रहावें

卐 卐

---

७ हे प्रजापते, उत्पन्न झालेल्या ह्या जगास तुझ्याशिवाय धारण करण्यास कोणीहि समर्थ नाहीं म्हणून ज्या इच्छेनें आम्ही तुला उद्देशून हवन करू त्या आमच्या इच्छा पूर्ण होवोत. तुझ्या कृपेनें आम्हाला धनवान होऊ दे ( ऋ. १०.१२१ १० )

## ( ३ ) अंजलि–क्षारण

१. अंजलि–क्षारण

आचार्य—कुमारस्य शुचित्वसिद्धये सवितृदेवतातृप्तये चाञ्जलि-क्षारण करिष्ये। ( शुद्धोदकेन शिष्याञ्जलिमापूर्य स्वस्याञ्जलिमन्येन पूरयित्वा तत्सवितुरित्यस्य श्यावाश्व सविता नुष्टुभ् अवक्षारणे विनियोग ।

२ सवितृ–समर्पण

ॐ तत्सवितुर्वृणीमहे वयं देवस्य भोजनम् ।
श्रेष्ठं सर्वधातमं तुरं भगस्य धीमहि ॥ ८ ॥

( अनेन स्वाञ्जल्युदक शिष्याञ्जलाववक्षार्य तञ्जल कुमाराञ्जलिनैवावक्षारयेत्। तत शिष्यत्वसिद्ध्यर्थं कुमारस्य दक्षिणे हस्ते

---

## ( ३ ) अंजलि–क्षारण

१. अजलि क्षारण

**आचार्य**—कुमाराच्या पवित्रतासाठीं आणि सवितृदेवतेच्या तृप्तीसाठी अञ्जलिधारण करतो असा संकल्प करावा

पाण्या शुद्ध पाण्यानें शिष्याची ओंजळ भरून आपली ओंज्ळ दुसऱ्या कडून भरावी.

२ सवितृसमर्पण

तत्सवितु ' या मत्राचा श्यावाश्व ऋषि, सविता देवता, अनुष्टुभ् छद, अवधारणकर्मांत उपयोग.

' तत्सवितुर्॰ ' (८) या मत्रानें आपल्या ओंजळीतील पाणी शिष्याच्या

---

८ (स्तुति करणारे ) आम्ही उपासनीय अशा सूर्यनारायणाच सव श्रेष्ठ, सर्वांस धारण करणाऱ्या, व शत्रूंचा नाश करणार असे दैवी तेज ( भोजन) याचे आम्ही ध्यान करतो

(ऋ. ५ ८२. १.)

साङ्गुष्ठ गृह्णीयात् । ) तत्र मन्त्रः —

ॐ देवस्यं त्वा सवितुः प्रसुवेऽश्विनोर्बाहुभ्यां । पूष्णो हस्ताभ्यां हस्तं गृह्णामि ॥ ९ ॥ अमुकशर्मन्

३. सवितृ-पूजन

( पुन पूर्ववदुदकपूरणादि कृत्वावक्षार्य । द्वितीये मत्रविशेष )

ॐ सविता ते हस्तमग्रभीत् ॥ १० ॥

( हस्त गृह्णामि ) अमुकशर्मन् । ( पुनरपि पूर्ववत्पूरयित्वावक्षार्य

ॐ अग्निराचार्यस्तव ॥ ११ ॥

( हस्त गृह्णामि अमुकशर्मन् ( इति तृतीये अवक्षारयेत् )

---

ओंजळींत टाकावें व तें पाणी शिष्याच्या ओंजळींतून खालीं बोटाच्या फटींतून सांडवावें. यास ' अवक्षारण ' म्हणतात.

३. सवितृपूजन

नंतर शिष्यपण सिद्ध होण्याकरितां बटूचा अंगुष्ठासहित हात ' देवस्य-त्वा० ' ( ९ ) या मंत्रानीं धरावा. ' अमुक शर्मन् ' अशा प्रकारें बटूचें संबोधन निमित्तीत नाव घ्यावें आणि पुन आपल्या हातातून त्याचे हातात व त्यातून खालीं असे अवक्षारण करावें.

ॐ सविता ते० ( १० ) हा मंत्र म्हणून पहिल्याप्रमाणें हात धरावा व पूर्वीप्रमाणे अवक्षारण करावें.

' ॐ अग्निराचार्यस्तव, अमुकशर्मन् ' हा मंत्र म्हणून तिसऱ्या वेळीं हात धरावा व अवक्षारण करावें.

---

९. सूर्याच्या आज्ञेवरून अश्विदेवतारूप माझ्या बाहूनें व पूषन् देवता रूप माझ्या हातांनीं ( तुझा ) हात ग्रहण करतों ( आश्व. गृ. सू. १ २०.४

१०. सविता ( रूप मी ) तुझे हात ग्रहण करितों. ( आश्व गृ. सू. १.२०. ६. )

११. अग्निरूप आचार्य तुझा हात ग्रहण करितो. ( आश्व. गृ. सू १.२०.५

## ४. प्रजापति-देवता-पूजन

( अथाचार्यो ब्रह्मचारिणा सह निष्क्रम्य )

ॐ देवसवितरेष ते ब्रह्मचारी तं गोपाय समामृत ॥ १२ ॥

( इत्युक्त्वा संरक्षणार्थं व्रतपतये आदित्याय बटुं ददामीति मनसा स्मरन् ब्रह्मचारिणमादित्यमीक्षयेत् । ततोऽन्योन्याभिमुखौ तिष्ठेताम् )

आचार्यः-कस्य ब्रह्मचार्यसि प्राणस्य ब्रह्मचार्यसि ।

कस्त्वा कमुपनयते काय त्वा परिददामि ॥ १३ ॥

( इति मंत्र जपन् कुमारं प्रजापतये मनसा समर्प्य )

卐 卐

---

## ४. प्रजापति—देवतापूजन

बाहेर सूर्य दिसेल अशा ठिकाणी येऊन 'ॐ देवसवितरेष॰' ( १२ ) या मंत्राने व्रताचा रक्षण करणारा जो आदित्य त्याला हा बटु संरक्षणार्थ मी समर्पण करतो, असे मनात म्हणून ब्रह्मचाऱ्यास सूर्य दाखवावा. ब्रह्मचारी आणि आचार्य यांनी समोरासमोर उभे राहावें व आचार्याने 'कस्य ब्रह्मचार्यसि॰' ( १३ ) हा मंत्राचा जप करीत कुमाराला प्रजापति देवतेस मनाने समर्पण करावें.

卐 卐

---

१२. हे प्राणिमात्रांना उत्पन्न करणाऱ्या तेजस्वी सूर्यदेवा, हा ब्रह्मचारी तुला रक्षण करण्यास योग्य आहे. म्हणून त्याचें रक्षण कर. त्याला अमर कर.
( आश्व. गृ. सू. १.२०.३ )

१३. प्रजापति देवतेचा तू ब्रह्मचारी आहेस. वायुदेवतेचा तू ब्रह्मचारी आहेस. प्रजापति तुला आपणाजवळ घेत आहे आणि मी तुला प्रजापतींना देत आहे.
( आश्व. गृ. सू. १.२०.७ )

## ( ४ ) हृदयालंभन

युवा सुवासा इत्यस्य कौशिको विश्वामित्रो यूपस्त्रिष्टुप् । पूर्वार्धर्चस्य प्रदक्षिणावर्तने, उत्तरार्धर्चस्य पाणिभ्या बटुहृदयालम्भने विनियोग ।

ॐ युवा सुवासाः परिवीत आगात् स उ श्रेयान् भवति जायमानः ॥ १४ ॥

( इति बटु प्रदक्षिणमावर्तनेन प्राङ्मुखमवस्थाप्य तदंसयोरुपरि स्वपाणी गमयित्वा )

ॐ तं धीरासः कवय उन्नयन्ति स्वाध्यो ३ मनसा देवयन्तः ॥ १५ ॥

( इति पाणिभ्या बटुहृदय स्पृशेत् । तत आत्मानमग्निं चान्तरा बटु

---

## ( ४ ) हृदयालंभन

'युवासुवासा०' ह्या मंत्राचा कौशिककुलोत्पन्न विश्वामित्र ऋषि, यूप देवता आणि त्रिष्टुभ् छंद होय

पहिल्या अर्ध्या ऋचेचा बटूस प्रदक्षिणा फिरविण्याकडे व दुसऱ्या अर्ध्या ऋचेचा दोन हातानी बटूच्या हृदयाला स्पर्श करण्याकडे उपयोग

'युवा सुवासा ०' ( १४ ) या मंत्रानें बटूस उजवीकडे फिरवून, पूर्वेकडे तोंड करून उभे करावें नंतर त्याच्या खांद्यावरून स्वत चे दोन्ही हात लांब पोंचवून त्या दोन्ही हातांनी 'त धीरास ०' ( १५ ) ह्या मंत्राचा भाग बोलावें

---

१४ सुंदर वस्त्र धारण केलेला, कृष्णाजिन पांघरलेला, हा तरुण ब्रह्मचर्य आश्रमांत गेला

१५ तो दुसऱ्या जन्मांत जाणारा, विद्या वगैरे शिकून चांगला होवो अशा कुमाराला, तपस्वी व योगी लोक उत्पन्न नेवोत ( ऋ ३ ८ ४ )

नीत्वा प्रत्यगग्नेः स्वयमुपविश्य स्वस्य दक्षिणतः प्राङ्मुखं तमुपवेशयेत् )

卐 卐

## ( ५ ) प्रथम अग्निकार्य

१ समिधा–समर्पण

बटुः —( परिसमूहनम्, पर्युक्षणम् कृत्वा ) अग्नये समिधमित्यस्य हिरण्यगर्भोऽग्निर्बृहती समिधाधाने विनियोगः ।

ॐ अग्नये समिधमाहार्षं बृहते जातवेदसे ।

तया त्वमग्ने वर्धस्व समिधा ब्रह्मणा वयं स्वाहा ॥ १६ ॥

अग्नय इदं न मम । ( दक्षिणं पाणिं प्रक्षाल्याग्नौ प्रताप्य )

ॐ तेजसा मा समनज्मि ॥ १७ ॥

---

म्हणून बटूच्या हृदयास स्पर्श करून बटूस आपल्या व अग्नीच्या मधून नेऊन आपण पश्चिमेकडे तोंड करून बसल्यावर बटूस पूर्वेकडे तोंड करून बसवावें.

卐 卐

## ( ५ ) प्रथम अग्निकार्य

१. समिधासमर्पण

परिसमूहन, पर्युक्षण करावें. ' अग्नये समिध० ' (१६) या मंत्राचा हिरण्यगर्भ ऋषि, अग्नि देवता, बृहती छंद, समिधासमर्पणाकडे उपयोग. हा मंत्र म्हणून समिधा अग्नीत देऊन ' अग्नय इदं न मम ' असें म्हणावें. या नंतर उजवा

---

१६ मीं श्रेष्ठ आणि बुद्धिमान अशा अग्नीकरिता समिधा आणली हे अग्निनारायणा, तू त्या समिधांनी प्रज्वलित हो. आणि आमचा उत्कर्ष कर. (आश्व. गृ. सू. १.२१.१.)

१७. तुझ्या तेजानें मी संयुक्त होतो. ( आश्व. गृ. सू. १.२१.४)

(इति मुखमग्राद् निमृज्य पाणिं प्रक्षाल्यैव पुनर्द्विः । ततः तिष्ठन् प्रणतिमुद्रां कृत्वा)

२. अग्न्युप-स्थानम्

मयि मेधामिति षण्णां हिरण्यगर्भ ऋषिः । पूर्वेषां त्रयाणामग्नीद्रसूर्या देवता, उत्तरत्रयाणामग्निर्देवता । गायत्री छंदः । अग्न्युपस्थाने विनियोगः ।

ॐ मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मयीद्र इंद्रियं दधातु ।
मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥
यत्ते अग्ने तेजस्तेनाहं तेजस्वी भूयासम् ।
यत्ते अग्ने वर्चस्तेनाहं वर्चस्वी भूयासम् ॥ १८ ॥

---

हात धुवून व अग्नीवर तापवून 'ॐ तेजसा०' (१७) हा मंत्र म्हणून तो हात वरून खाली अथवा ताळावरून फिरवून तोंड धुवावें व पुन्हा हात धुवावा, असें पुन्हा दोन वेळ करावें.

२ अग्न्युपस्थान—अग्नीची प्रार्थना

नंतर हात जोडून उभे रहावें व 'ॐ मयि मेधा' (१८) मंत्रानी प्रार्थना करावी

'मयि मेधां' इत्यादि सहा मंत्राचा हिरण्यगर्भ हा ऋषि, पहिल्या तीन मंत्राच्या अनुक्रमें अग्नि, इंद्र व सूर्य ह्या देवता व पुढील तीन मंत्राची अग्नि देवता, गायत्री छंद, प्रार्थनेकडे उपयोग. ह्याप्रमाणें सहाहि मंत्र म्हणून प्रार्थना करावी

---

१८. स्तुति केला जाणारा अग्नि मला बुद्धि, प्रजा आणि तेज देवो इंद्र (बुध्यादिकांनीं समर्थ अशी) इंद्रियें देवो सूर्य मला बुद्ध्यादिक इंद्रिय आणि तेज देवो हे अग्ने, तुझ्या तेजानें मी तेजस्वी होईन. हे अग्ने तुझ्या वचानें मी वचस्वी होईन, हे अग्ने तुझ्या कांतीनें मी कांतिमान होईन.

(आश्व. गृ. सू. १.२१.४)

३. विभूति–ग्रहणम्

मानस्तोक इति कुत्सो रुद्रो जगती । विभूतिग्रहणे विनियोग' ।

ॐ मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।

वीरान् मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मन्तः स दमित्वा हवामहे ॥ १९ ॥

४. विभूति–धारण

(भस्म आदाय)
त्र्यायुष जमदग्नेरिति ललाटे ।
कश्यपस्य त्र्यायुषमिति कण्ठे ।
अगस्त्यस्य त्र्यायुषमिति नाभौ ।

---

३. विभूतिग्रहण—भस्म ग्रहण

'मानस्तोके०' (१९) ह्या मन्त्राचा कुत्स ऋषि, रुद्र देवता व जगती छंद होय. भस्मग्रहणाकडे उपयोग. 'ॐ मानस्तोके०' (१९) ह्या मन्त्राने भस्म पळीत घ्यावे.

४. विभूति धारण—

'त्र्यायुष' ह्या मंत्राने कपाळीं, 'कश्यपस्य०' ह्या मंत्राने गळ्यास, 'अगस्त्य०'

---

१९. हे रुद्रा, आमची मुलें, नातू, आमचे संबंधी लोक, गाई आदि पशु व घोडे यांना मारू नकोस आणि हे रुद्रा, आमच्या शूर लोकांना रागावून वधू नकोस. आम्ही हविर्भाग देऊन तुला नेहमीं बोलावीत जाऊ.
(ऋ. १.११४.८.)

यद्देवानां त्र्यायुषमिति दक्षिणस्कंधे ।
तन्मे अस्तु त्र्यायुषमिति वामस्कंधे ।
सर्वमस्तु शतायुषमिति शिरसि ॥ २० ॥

परिसमूहनम् । पर्युक्षणम् ।

५. प्रार्थना

ॐ च मे स्वरश्च मे यज्ञोप च ते नमश्च ।
यत्ते न्यून तस्मै त उपयत्तेऽतिरिक्त तस्मै ते नम ॥ २१ ॥

---

ह्या मत्रानें नाभीस, 'यद्देवाना०' ह्या मत्रानें उजव्या खांद्यास, 'तन्मेअस्तु०' ह्या मत्रानें डाव्या खांद्यास आणि 'सर्वमस्तु०' (२०) ह्या मत्रानें मस्तकास विभूति लावून पुन परिसमूहन, पर्युक्षण करून्यावर हात जोडून उभे राहावें, व पुढील मत्र म्हणावेत.

५ प्रार्थना

'ॐ च मे' (२१) इत्यादि मत्रानें स्तुति केल्यावर अग्नीच्या उत्तरेकडे

---

२०. तीनवेळा जमदग्नीचे अपमृत्यु टाळणारें हें भस्म मी कपाळावर धारण करितों. हें भस्म जमदग्नीप्रमाणें माझेहि अपमृत्यु टाळो.

कश्यपाच तीनदा अपमृत्यु टाळणारें भस्म मी गळ्याच ठिकाणीं धारण करतों अगस्तीच तीनदा अपमृत्यु टाळणारें भस्म मी नाभीचे ठिकाणीं धारण करितों.

ज्यानें देवांना तीनदा अपमृत्यूतून तारिलें तें भस्म माझ्या उजव्या खांद्याचे ठिकाणीं असो

(मला अपमृत्यु न येना) पूर्ण शमर वर्षे आयुष्य असो, म्हणून हें भस्म मी मस्तकावर धारण करितो (शु. य अ ३)

२१. सर्व वेदांतील मुख्य ॐ, व सर्व वर्णांतील स्वर तूच आहेस यज्ञ पूर्ण करणाऱ्या तुला नमस्कार असो कमी जास्त असेल त्याकरतां क्षमा प्राप्त व्हावी म्हणून हे अग्ने, तुला नमस्कार करतो. (आ. श्रौ सू. १११)

अग्नये नमः । ॐ स्वस्ति ।
श्रद्धा मेधा यशः प्रज्ञा विद्या बुद्धिं श्रियं बलम् ।
आयुष्यं तेज आरोग्य देहि मे हव्यवाहन ॥ २२ ॥

卐 卐

## ( ६ ) गायत्री–उपदेश

अभिवादनम्—( अग्नेरुत्तरतो गत्वा प्रत्यङ्मुखीभूय आचार्याभिमुखो भूत्वा, दक्षिण जानु भूतले निधाय, पाणिभ्यां सव्यदक्षिणे श्रोत्रे संस्पृश्य, व्यस्तपाणिराचार्यस्य दक्षिणपादं स्वदक्षिण हस्तेन, सव्य च सव्यहस्तेन जानुप्रभृति पादपर्यन्तं स्पृष्ट्वा )

कुमार—अमुक गोत्रोऽमुकशर्माऽहं भो अभिवादये ( गुरु नमस्कुर्यात् । )

---

चाऊल पश्चिमेकडे तोंड करून आचार्यांसमोर व्हावे.

卐 卐

## ( ६ ) गायत्री–उपदेश

मग खाली बसून उजवा गुडघा जमिनीवर टेकून, उजव्या व डाव्या हातांनी दोन्ही कानास स्पर्श करून, आचार्यांच्या उजव्या पायास आपल्या उजव्या हाताने स्पर्श करता येईल असे हात करून गुडघ्यापासून पावलापर्यंत स्पर्श करावा.

बटु—अमुक गोत्राचा व अमुक नावाचा मी, हे गुरो प्रणाम करतो असे म्हणून नमस्कार करावा.

---

२२. हे हव्यवाहन अग्ने, तू मला श्रद्धा, मेधा, यश, प्रज्ञा, विद्या, बुद्धि, संपत्ति, बल, आयुष्य, तेज व आरोग्य दे.

**आचार्य**—आयुष्मान् भव सौम्य देवदत्ता ३। (इत्याशीर्वाद)।

**कुमार**—(सावित्र्युपदेश वाञ्छन्) अधीहि भो सावित्री, भो अनुब्रूहि।

(इत्याचार्यमुक्त्वा स्वनामपाणिमुत्तानीकृत्य दक्षिण पाणिं न्यङ्मुगीकृत्य सधाय पाणिपृष्ठमगुलीर्थांगुष्ठौ च दृढीकृत्य कृत ब्रह्मांजलिं दक्षिणाङ्के निधाय आचार्यान्तिकम् आसीत)

**आचार्य**—तदञ्जलिं तत्परिधानीयवाससाच्छाद्य स्वपाणिभ्यां तदञ्जलिं परिगृह्य)

प्रणवस्य परब्रह्म ऋषि। परमात्मा देवता। दैवी गायत्री छन्द। व्याहृतीनां परमेष्ठी प्रजापति प्रजापतिर्बृहती। गायत्र्या विश्वामित्र सविता गायत्री। उपनयनोपदेशे विनियोग।

---

**आचार्य**—हे देवदत्ता, दीर्घायुषी हो.

**बटु**—(मनात गायत्री उपदेशाची इच्छा धरून) हे गुरो, प्रथम आपण गायत्रीमंत्र म्हणून मला म्हणायास सांगा

मग आपला डावा हात उताणा करून व उजवा पालथा करून त्याच्याशी जोडावा, आणि दोनहि हातांचे अग्रभाग बोटांनीं घट्ट दाबावे व दोनहि आंगठे परस्पर दृढ करावे याचेच 'ब्रह्मांजलि' म्हणतात हा ब्रह्मांजलि उजव्या मांडीवर ठेवून आचार्याजवळ बसावे मग आचार्याने ती ओंजळ त्याच्याच पांघरलेल्या वस्त्रानें झाकून, आपल्या दोनहि हातांनीं धरून उपदेशास आरंभ करावा.

**मंत्रोपदेश**—प्रणवाचा परब्रह्म ऋषि, परमात्मा देवता, दैवी गायत्री छंद, व्याहृतीचा परमेष्ठी प्रजापति ऋषि, प्रजापति देवता, बृहती छंद गायत्री मंत्राचा विश्वामित्र ऋषि, सविता देवता व गायत्री छंद, उपनयनसंस्कारातील उपदेशाकडे विनियोग

## २. दण्ड–प्रदानम्

आचार्यः—स्वस्ति न इत्यस्य स्वस्त्यात्रेयो विश्वेदेवास्त्रिष्टुप् । दण्डदाने विनियोगः ।

ॐ स्वस्ति नो मिमीतामश्विना भगः स्वस्ति देव्यदितिरनर्वणः ।
स्वस्ति पूषा असुरो दधातु नः स्वस्ति द्यावापृथिवी सुचेतुना ॥ २७ ॥

(इति मन्त्रेण दण्डं दद्यात् ।)

बटु —(दण्डग्रहणमन्त्र)

अदान्त दमयित्वा मां मार्गे संस्थापयन् स्वयम् ।
दण्डः करे स्थितो यस्मात्तस्माद्रक्ष यतो भयम् ॥

---

## २. दण्डप्रदान

आचार्य—'स्वस्ति नो' ह्या मंत्राचा अत्रिगोत्रोत्पन्न स्वस्ति हा ऋषि, विश्वेदेव देवता, त्रिष्टुप् छंद, बटूस दंड देण्याकडे उपयोग. स्वस्ति नो० (२७) हा मंत्र म्हणून बटूला दंड द्यावा.

बटु—उद्धत असलेल्या मला दमन करून सन्मार्गाला लावणारा हा दण्ड मी हातात धरला आहे. हे दण्डा, जिकडून मला भय प्राप्त असेल तिकडून माझे रक्षण कर. हा दण्डग्रहणाचा मंत्र बटूकडून म्हणवावा.

---

२६. सत्य व तप यांचें संरक्षण करणारी, राक्षसांना मारणारी व शत्रूंना पराभूत करणारी तू आम्हांस प्राप्त हो. हे मेखले, मंगलकारक व रक्षक अशा तुला, धारण करणाऱ्या आम्हांला कधीहि (तुझ्या सामर्थ्याने) पीडा होऊ नये.
(आश्व. गृ. सू. २१ परिशिष्ट)

२७. अश्विदेव आमचें कल्याण करोत. तसेंच भग, देवी अदिति, बल देणारा पूषदेव आमचें कल्याण करो. तसेंच द्यावापृथ्वीहि आमचें कल्याण करोत.
(ऋ. ५. ५१. ११)

३ उपदेश :

ब्रह्मचार्यसि । (१) अपोशान (आचमन कुरु । मूत्रपुरीषादौ शुद्धयर्थमित्यर्थ ) (२) कर्म कुरु । (मध्योपासनादीत्यर्थ ) (३) दिवा मा स्वाप्सी । (४) आचार्याधीनो वेदमधीष्व । (५) सायंप्रात भिक्षेथा । (६) सायं प्रात समिधमाधेहि (७) द्वादशवर्षाणि वेदग्रहणात वा ब्रह्मचर्यं चर । (८) अप्रत्याख्यायिनमग्रे भिक्षेथा । अप्रत्याख्यायिनी वा ।

४ अग्निपूजनम्

(तत स्थालीपाकतन्त्रेण विरुपाक्षतादि वा वैश्वदेवतन्त्रेण अग्निपूजनादि वा कुर्यात्)

卐 卐

---

३ उपदेश

(कुमाराला) तू ब्रह्मचारी आहेस तेव्हा (१) मूत्र, शौच, भोजन वगैरे नंतर हातपाय धूत जा (२) संध्या, उपासना वगैरे कर्मे करीत जा (३) दिवसा झोंप घेत जाऊ नकोस (४) आचार्याच्या स्वाधीन राहून वेद व ज्ञान संपादन कर (५) सध्याकाळीं व सकाळीं भिक्षा मागत जा (६) सायंकाळीं व सकाळीं अग्नीवर समिध देत जा. (७) बारा वर्षे किंवा शिक्षण संपेपर्यंत ब्रह्मचर्य पाळ (८) जो पुरुष अथवा जी स्त्री तुला कांहीं तरी भिक्षा दिल्याखेरीज परत जाऊ देणार नाहीं, त्याज्कडे भिक्षा मागण्यास जात जा

४ अग्निपूजन

यानंतर स्थालीपाक पद्धतीनें किंवा वैश्वदेवपद्धतीने अग्निकार्य करावें

卐 卐

## (८) अनुप्रवचनीय होम :

(सायंसंध्योत्तर कृतोपनयनहोमाग्ने पश्चिमतो ब्रह्मचारिणा सह उपविश्य, आचम्य, प्राणानायम्य, देशकालौ संकीर्त्य)

संकल्प

उपनयनाङ्गभूत अनुप्रवचनीयहोम करिष्ये ।
(स्थालीपाकतन्त्रेण वैश्वदेवतन्त्रेण वाग्निकार्यं कृत्वा)

प्रधान होम

(अवदानधर्मेण चरुमवदाय) सदसस्पतिमित्यस्य काण्वो मेधातिथि सदसस्पतिर्गायत्री । अनुप्रवचनीयप्रधानहोमे विनियोग ।

ॐ सद॑सु॒स्पति॒मद्भु॑तं प्रि॒यमिन्द्र॑स्य॒ काम्य॑म्।
स॒निं मे॒धाम॑यासिषं॒ स्वाहा॑ ॥ २८ ॥

सदसस्पतय इदं न मम ।

---

## (८) अनुप्रवचनीय होम

१ प्रधान होम

आचार्यानें सायंसंध्यादि आटेपून, उपनयनाग्नीच्या पश्चिमेस बसून बटूसह आचमन, पवित्रधारण, प्राणायाम केल्यावर—

संकल्प—उपनयनाङ्गभूत अनुप्रवचनीय होम करतो, असा संकल्प सोडावा

नंतर स्थालीपाकतंत्र किंवा वैश्वदेवतंत्र यापैकीं ज्या तंत्रानें कर्म करावयाचें असेल त्याप्रमाणें करून, नंतर अवदानधर्मानें चरु घेऊन वरीलप्रमाणें आहुति द्याव्यात

---

२८ यज्ञाचा पति, प्रभावशाली, व इन्द्राला आवडणाऱ्या अशा अग्नीला धन आणि उत्तम बुद्धि आम्ही मागतों [ऋ १.१८]

तत्सवितुरित्यस्य गाथिनो विश्वामित्र सविता गायत्री । अनुप्रवचनीयहोमे विनियोग ।

ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् स्वाहा ॥ २९ ॥

सवित्र इदं न मम ।

ॐ ऋषिभ्य स्वाहा । ऋषिभ्य इदं न मम ॥

(स्थालीपाक-तंत्रेण स्विष्टकृतादि वैश्वदेवनवग वाग्निपूजनादि कुर्यात्)

卐 卐

## (९) मेधाजनन

आचार्य —(आचम्य पवित्रपाणि प्राणानायम्य देशकालौ सकीर्त्य)

१ सकल्प

ममास्य कुमारस्य उपनयनव्रतसमाप्तिवेदग्रहणसामर्थ्यलक्षण मेधासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं मेधाजननाख्य कर्म करिष्ये ।

तत्रादौ मेधापरनामकब्रह्मवृक्षपूजन करिष्ये ।

(वेद्यां पलाशशाखा प्रतिष्ठाप्य तत्र तां पूजयेत्)

---

आहुति दिल्यानतर होमकृत्य सरवावें हवि शेष ब्राह्मणास द्यावा

卐 卐

## (९) मेधाजननप्रयोग

आचार्यान (आचमन, पवित्रधारण, प्राणायाम व देशकालाचा उच्चार करून)

---

२९ जो सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो त्याच्या श्रेष्ठ व पापनाशक तेजाचे आम्ही ध्यान करितो

२ मेधापूजनम्

मेधायै नमः । आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नान, वस्त्र, अलंकारान्, चंदन, हरिद्राकुंकुम, परिमलद्रव्य, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, मंत्रपुष्प, प्रार्थनापूर्वक नमस्कार च समर्पयामि । (नैवेद्यसमये यावकसक्तुमिश्रमन्न मोदकाश्च निवेद्य पुनः पूर्ववत्पूजयेत्) । मेधा ब्रह्मचारिणा प्रणमय्य शुद्धजलधारोदकेन सेचन कुर्वता वटुना त्रिः प्रदक्षिण कारयन् मंत्र वाचयेत्)

३ प्रदक्षिणा

वटु —ॐ सुश्रव सुश्रवा असि यथा त्वम् ।
सुश्रव सुश्रवा अस्येव मा सुश्रव सौश्रवस कुरु ।
यथा त्व देवानां यज्ञस्य निधिपोऽस्येवमह ।
मनुष्याणा वेदस्य निधिपो भूयासम् ॥ ३० ॥

---

१. संकल्प—

हा माझ्या कुमाराच्या उपनयनव्रताची संपूर्णता आणि वेद धारण करण्याची सामर्थ्यरूप बुद्धि उत्पन्न होऊन श्रीपरमेश्वराच्या तुष्टीसाठीं मेधाजनन नामक कर्म करतो अशा संकल्प करावा

२. मेधापूजन—

मेधा हें जिचे दुसरें नाव आहे, अशा ब्रह्मवृक्षाचे पूजन करतो, अशा पुन संकल्प सोडावा, व एक मातीचा ओटा करून त्यात पळसाची फादी रोवावी मग त्या फांदीवर 'मेधायै नमः' या नाममंत्रानं आवाहनादि उपचारानीं पूजा करावी भाताचा व मोदकाचा नैवेद्य समर्पण करावा. पुन पूर्वीप्रमाणे पूजन करून ब्रह्मचाऱ्याकडून नमस्कार करवावा.

३ प्रदक्षिणा

नंतर माडयान पाण्याची धार धरीत त्या ओट्या भोवती वटूकडून 'ॐ सुश्रव -

( प्रतिप्रदक्षिण मन्त्रावृत्तिं प्रणाम च कारयेत । ततो ब्रह्मचारी स्नात्वा नवान् यज्ञोपवीताजिनमेखलादण्डान् उपनयनवत् समन्त्रकं धृत्वा पुराणानि पलाशमन्निधौ विसृज्य पूर्वधृतवाससी गुरवे दत्वा मेधां मह्यमिति सूक्तं विप्रैः पाठयित्वा अस्य कर्मणः पुण्याहं भवन्तो ब्रुवन्त्विति स्वस्तिवाचनं कुर्यात् )

## ४. मेधासूक्तम्

ॐ मे॒धां म॒ह्यमङ्गि॑रसो मे॒धां स॒प्तर्ष॑यो ददुः ।
मे॒धामिन्द्र॑श्चा॒ग्निश्च॑, मे॒धां धा॒ता द॑दातु मे ॥

---

सुश्रवा ' ( २९ ) हा मंत्र म्हणवीत तीन वेळां प्रदक्षिणा करवावी दर प्रदक्षिणेस समंत्र मंत्र म्हणून दोवर्ग नमस्कार करवावा नंतर ब्रह्मचाऱ्याने स्नान करून नवीन जानवें, अजिन, मेखला व दण्ड उपनयन-प्रयोगांत मागितल्याप्रमाणे त्या त्या मंत्रानीं धारण केल्यावर जुनी यज्ञोपवीतादि पळसाजवळ टाकावीं

### ४. मेधासूक्त

पूर्वीची धारण केलेली वस्त्रं गुरूला देऊन, ब्राह्मणाकडून ' मेधा मह्य ( ३० ) हें सूक्त म्हणवावें मग ह्या कर्मास हा पुण्य दिवस आहे असं तुम्ही म्हणावें, असं स्वस्तिवाचन करावें.

---

३० हे पलाशदण्डा, तू विचारपूर्वक चाललेल्या ब्रह्मविषयक गोष्टींचा श्रोता आहेस. तू जसा ब्रह्मविषयक गोष्टींचा श्रोता आहेस तसा मला कर त्याप्रमाणें देवाच्या यज्ञाचा संरक्षण करणारा आहेस त्याप्रमाणें मला वेदाचा संरक्षण करणारा कर [ आश्व. गृ. सू अ. १ खं २२ सू. १९ ].

३१ अंगिरस ऋषि, सप्तऋषि, इंद्र, अग्नि आणि ब्रह्मदेव हे सर्व कधीं विस्मृति न होईल अशी मेधा मला देवोत.

मेधां मे वरुणो राजा, मेधां देवी सरस्वती ।
मेधां मे अश्विनौ देवावाधत्तां पुष्करस्रजा ॥
या मेधा अप्सरस्सु, गंधर्वेषु च यन्मनः ।
दैवी या मानुषी मेधा, सा मामाविशतादिमाम् ।
यन्मे नोक्तं तद्रमतां शकेयं यदनुब्रुवे ॥
निशामं तन्निशामहै मयि व्रतं सह व्रतेषु ।
भूयासं ब्रह्मणा संगमेमहि ॥
शरीरं मे विचक्षणं वाङ् मे मधुमद्दुहा ।
अवृद्धमहमसौ सूर्यो ब्रह्मणानीस्थः श्रुतं मे मा प्रहासीः ।
मेधां देवीं मनसा रेजमानां गंधर्वजुष्टां प्रति नो जुषस्व ॥
मह्यं मेधां वद मह्यं श्रियं वद, मेधावी भूयासमजरां जरिष्णु॥

---

वरुण राजा, सरस्वती देवी व कमलाच्या माला धारण करणारे अश्विनी मला मेधा देवोत

जी अप्सरोगणामध्यें व गंधर्वलोकामध्ये मनोरूपानें मेधा राहाते तशीच जी देवामध्यें व मनुष्यात असते ती माझ्या बुद्धिप्रत प्रविष्ट होवो.

मी जरी पठण केलें नसेल अथवा वारंवार करीत नसेन, तरी हा वेद माझ्या अंतःकरणात स्थिर राहो, आणि प्रसंगास निःसंदेह म्हणेन असा मला आठवो. जें मी कानांनीं ऐकून तें माझ्या लक्षात राहो माझा वेदाचें व्रत कोणाहि वेदज्ञाशीं बरोबरी करणारे असो

माझे शरीर तरतरीत असो, मनाला मोह पाडणाऱ्या गोष्टींचा द्रोह करणारी माझी वाणी, सदोदित उत्साही असणारा मी, हा सूर्य, हे ज्ञानावर माझी आसक्ति जडवून एका मानावर पडलेलें कधींहि न विसरेल असें करोत

सदसस्पतिमद्भुतं प्रियमिन्द्रस्य काम्यं ।
सनिं मेधामयासिषं ॥
यां मेधां देवगणाः पितरश्चोपासते ।
तया मामद्य मेधयाऽग्ने मेधाविनं कुरु ॥
मेधाव्य १ हं सुमनाः सुप्रतीकः, श्रद्धामना. सत्यमतिः सुशेवः।
महायशा धारयिष्णु. भूयासमस्मे स्वधया प्रयोगे ॥ ३१ ॥
॥ इति उपनयनप्रयोगः ॥

卐 卐

---

मनाला शोभा देणारी, विशेष सामर्थ्यसंपन्न लोकांजवळ असणारी मेधा मला दे. मला बुद्धि व कांति असो, असे तू म्हण दिवसदिवस क्षीण होणारें हें शरीर जरेनें युक्त न होता मला बुद्धिमान कर

ज्या मेधादेवीची देवगण व पितर उपासना करतात त्या मेधादेवीच्या योगानें मला हे ब्रह्मदृष्टा, तू मेधावी कर

अन्तःकरणात चांगले विचार बाळगणारा, सुदृढ हस्तपादादि अवयव असलेला, आस्तिक्यबुद्धि मनांत धरणारा, एकनिष्ठ, सुस्वरूप, मोठा कीर्तिमान, धैर्यसंपन्न व प्रवचन करणारा असा मेधावी मी होईन आणि कोण-याहि विद्येच्या चर्चेच्या वेळीं मी आपल्या बुद्धीचा प्रभाव दाखवीन

( हे सव मंत्र ऋक्संहितेच्या परिशिष्टांतील आहेत )

卐 卐 卐

# मुंजींत म्हणण्याचीं मंगलाष्टकें.

( १ )

लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चंद्रमाः ।
गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवांगना. ।।
अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधेः ।
रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्यात्सदा मंगलम् ।।

( २ )

यं ब्रह्मा वरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवैः ।।
वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायंति यं सामगाः ।।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो ।
यस्यान्तं न विदुः सुराः सुरगणा देवाय तस्मै नमः ।।

( ३ )

गंगा सिंधु सरस्वती च यमुना गोदावरी नर्मदा ।
कावेरी शरयू महेंद्रतनया चर्मण्वती वेदिका ।।
क्षिप्रा वेत्रवती महासुरनदी ख्याता च या गंडकी ।
पूर्णा पूर्णजलैः समुद्रसहिताः कुर्वन्तु वो मंगलम् ।।

卐 卐 卐

समानी व आकूति । समाना हृदयानि वः ॥
समानमस्तु वो मनो, यथा वः सुसहासति ॥ (ऋ. १०.१९१.४)

मुलांनो, तुमचे विचार एकरूप आणि अन्तःकरणे एक विचाराने भारलेली असावीत

ज्यायोगे आपल्या राष्ट्राची संघशक्ति अभेद्य राहून ते उत्कर्षशाली बनेल, अशा ध्येयाने तुमची मनें भारलेली असावीत.

## संध्येविषयीं आख्यायिका

### तैत्तिरीय आरण्यकात

तैत्तिरीय आरण्यकात (तै. आ. २।२) संध्येविषयीं अशी आख्यायिका आहे कीं, "राक्षसांनीं पूर्व कल्पात उग्र तप करून प्रजापतीस प्रसन्न केलें व त्याजकडून आदित्य आम्हांस योद्धा असो असा वर मागितला. त्यास प्रजापतीनें अनुमोदन दिलें म्हणून सूर्यापासून पुनः सूर्योदय होईपर्यंत ते राक्षस सूर्याशीं युद्ध करतात. त्यांचें शमन गायत्रीनें अभिमन्त्रित जलानें होतें. म्हणून लोक पूर्वाभिमुख होऊन प्रातःसंध्येचे वेळीं अभिमन्त्रित जल उडवितात. तें जल वज्रासारखें होऊन त्या राक्षसांना मन्देहारुणद्वीपांत नेऊन टाकतें. जलप्रहार केल्यानें जी राक्षसांची हत्या घडते, ती 'असावादित्यो ब्रह्म' म्हणून पृथ्वीप्रदक्षिणा केल्यानें नाहींशी होते. उदय व अस्त पावतेवेळीं असें करणाऱ्या ब्राह्मणाचें कल्याण होईल."

### षड्विंश ब्राह्मणांत

दुसरी एक आख्यायिका षड्विंश ब्राह्मणात (ष. ब्रा. ४,४) अशी आहे कीं, देवांची व असुरांची स्पर्धा सुरू झाली. असुरांनीं आदित्यावर हल्ला केला

तेव्हा आदित्य भ्याला व त्याच हृदय कूर्मरूप धारण करून प्रजापतीकडे गेलें. तेव्हा प्रजापतीनें त्यावर उपाय शोधिले. 'ऋत च सत्य', 'ॐकार ब्रह्म, 'त्रिपाद्‌ गायत्री' हें जें वेदाचे मुख, हे उपाय आहेत असें त्याच्या ध्यानात आलें, म्हणून द्विज अहोरात्रीच्या संधीस याच्या साहाय्यानें संध्येची उपासना करतात.

एका ज्योतीचे दर्शन मंद झाल्यापासून दुसऱ्या ज्योतीचें दर्शन होईपर्यंत जो काल ती संध्या. दोन ज्योती म्हणजे नक्षत्रापासून सूर्य आणि सूर्यापासून नक्षत्रे हें संध्येचे स्वरूप व काल. जे सायंकाळीं बसून संध्योपासना करतात ते वीरस्थान जिंकतात संध्येत जें जल अर्घ्य म्हणून दिलें जातें तें वज्र बनून असुराचे हनन करतें. या उपायानें देवानीं असुराना जिंकलें. हें जाणणाराहि शत्रूवर जय मिळवितो. जो असें जाणून साय व प्रात संध्या करतो तो त्या योगे संतत व अविच्छिन्न वीरस्थान मिळवितो.

## अर्घ्यप्रदानाचें माहात्म्य

या आख्यायिकावरून अर्घ्यप्रदानाचें प्रामुख्य प्रशसात्मक पद्धतीनें वर्णन केलेलें दिसते. या दो-ही आख्यायिकावरून अर्घ्यप्रदानाचें लोकातील महत्त्व कसें प्राचीन आहे हेही समजून येत. तथापि काहीं अर्घ्याला, काहीं जपाला तर काहीं उपस्थानाला प्रमुखत्व देणारे सांप्रदाय आहेत. अर्घ्य हे अवैदिक आहेत असेही काहींना म्हटलेले आढळत. ऋग्वेदी फक्त जप, यजुर्वेदी फक्त अर्घ्यप्रदान, आणि सामवेदी फक्त उपस्थान प्रमुख आहे असें मानितात. यावरून सांप्रदायानुसार भिन्न मत असलीं, तरी योग्य व व्यवहार्य अशा मार्गाचा संग्रह करून प्रसार करणें हा मार्ग अनेक दृष्टींनीं अत्यत महत्त्वाचा आहे. संध्येच्या क्रमासबंधींमुद्धा भिन्नभिन्न अशा अनेक तऱ्हा दृष्टीस पडतात.

卐 卐

# ' संध्यावंदना'त अंतर्भूत धार्मिक कृत्यें

## संध्येतील मुख्य कर्म कोणतें ?

संध्या हा शब्द संधिकाळीं केल्या जाणाऱ्या उपासनेला लावण्यांत येतो. वास्तविक संध्या म्हणजे उपासना होय. संध्येत अर्घ्यप्रदान, गायत्रीजप आणि उपस्थान म्हणजे प्रार्थना हीं तीन कृत्यें मुख्य आहेत मार्जन, आचमन वगैरे कृत्यें गौण अंगभूत अशीं आहेत. या तिहींमध्यें अर्घ्यप्रदान मुख्य आहे. कारण वेदांत ' गायत्र्यभिमन्त्रिता अप ऊर्ध्वं विक्षिपन्ति ' ( तै. आ ) अशा प्रकारें फक्त अर्घ्यप्रदानच मुख्यत सांगितलें आहे. अशौचांत गायत्रीजप व उपस्थान न करता फक्त अर्घ्यदानच करावें ही गोष्टही अर्घ्यप्रदानाचे प्रामुख्यच सिद्ध करीत आहे असे कांहीं लोकांचें म्हणणें आहे पण याच्या उलट कांहीं लोकांचे म्हणणे असे आहे कीं—

उद्यन्तमस्तं यन्तमादित्यमभिध्यायन्कुर्वन् ब्राह्मणो विद्वान्सकलं भद्रमश्नुते असावादित्यो ब्रह्मेति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति य एवं वेद ।'

या तैत्तिरीय वाक्यांत फक्त ध्यानाचेंच विधान केलें आहे.

### गायत्री मंत्राचा जप

भारतीय युद्धांत रोज संध्यावंदनानुष्ठानाला असमर्थ असणाऱ्या अर्जुनादिकांनीं सूर्यध्यान म्हणजे गायत्रीमंत्राचाच जप केल्याचा उल्लेख आहे—

ते तथैव महाराज दंशिता रणमूर्धनि ।
संध्यागतं सहस्रांशुमादित्यमुपतस्थिरे ॥

यावरून गायत्री जपाला प्राधान्य आहे असे दिसतें आश्वलायन सूत्रांत 'सावित्रीं जपेत्' असें जपाचे प्रामुख्यानें विधान केलें असल्यामुळें आश्वलायनांना संध्या म्हणजे प्रामुख्यानें जपच होय. बाकीचा सर्व अंगभूत प्रकार आहे.

महाभारतांतील वरील वचनावरूनही सूर्यस्तुतीला विशेष प्राधान्य दिसतें. गायत्रीमंत्र हा सूर्यस्तुतीचा सुप्रसिद्ध मंत्र आहे, हें सर्व प्रकारच्या वेदानुयायांत सारखेंच प्रसिद्ध आहे. यावरून संध्या म्हणजे प्रार्थना, देवाच्या स्तुतिपर असे

मंत्र म्हणणें हे स्पष्ट होतें. अर्घ्यप्रदानाचें तैत्तिरीय आरण्यकांत जरी प्रत्यक्ष वर्णन असलें तरी संहिता ग्रंथांत प्रार्थनेचेंही पुष्कळ वर्णन आहे. यावरून स्पष्ट गोष्ट जर कोणती नजरेस येत असेल, तर ती संध्या म्हणजे देवाच्या शुद्ध प्रार्थनेचा असा एक विधि आहे आणि तो ऋग्वेदादि ग्रंथापासून चालू आहे ही होय.

## आचमन

आतां गौण अशाही ज्या गोष्टी संध्येंत आल्या आहेत, त्यांचें थोडक्यांत समालोचन करणें आवश्यक आहे. आचमन हा सर्वप्रसिद्ध विधि आपण संध्येंत प्रथम करतों. आचमनाचे प्रकार अनेक आहेत. संध्या सर्वत्र प्रचलित असणारा 'केशवाय नम' वगैरे प्रकार अग्निपुराणांतील आहे. तैत्तिरीय आरण्यकांत (२–११) सांगितलेला आचमनाचा प्रकार सूत्रें व याज्ञवल्क्यस्मृति वगैरे ग्रंथांत आढळतो.

आचमनाचे वेळीं थंड असें पाणी शांत रीतीनें आपण प्राशन करीत असतां आपलीं अवरिन्द्रियें कशीं समाधान पावतात व उल्हास कसा उत्पन्न होतो हें सर्वांनें अनुभवसिद्ध आहे. कोणत्याहि प्रकारचें आचमन घेतलें तरी त्यांत सर्व शरीराला उत्तेजक असणाऱ्या पाण्याचा उपयोग या दृष्टीनंच करावयास सांगितला आहे.

## प्राणायाम

प्राणायाम करण्याविषयीं कोठेंही मतभेद नाहीं. केवळ उपयुक्ततेच्या तत्त्वावर प्राणायाम प्रचलित झालेला आहे. प्राणायाम सर्वांना लक्षपूर्वक करावा. त्या योगें हृदय, फुप्फुसें यांचीं कार्यें अत्यंत सुरळीतपणें चालतात. पूरक, कुंभक व रेचक यांच्या पद्धती पुढें दिल्या आहेत. तिकडे लक्ष दिल्यानेंहि पुष्कळ लाभ होईल.

अत्यंत आवश्यक आहे. यासाठीच 'संकल्प' हा आपल्या प्रत्येक धार्मिक कृत्याचा एक आवश्यक भाग मानण्यात आला आहे

संकल्प करण्याचे अनेक प्रकार रूढ आहेत त्यांत 'ममोपात्तदुरितक्षय-द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं' हा प्रकार सर्वमान्य व रूढ आहे तोच आम्ही स्वीकारला आहे बाकीचे प्रकार थोडक्यात असे आहेत —

| | |
|---|---|
| उपात्तदुरितक्षयार्थं (कुमारिमत)<br>विधिसिद्ध्यर्थं (गुरुमत)<br>श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं (शारीरकभाष्य)<br>प्रत्यवायपरिहारार्थं (भट्टसोमेश्वरमत) | } प्रात संध्यामुपासिष्ये |

यामध्ये मतभेदांची सूक्ष्म अशी कारणें आहेत. परंतु आपणास इतक्या खोल विचारात शिरण्याची जरूरी नाही

## मार्जन

याज्ञवल्क्य व छांदोग्य परिशिष्ट 'आपो हि ष्ठा' वगैरे तीन ऋचांनीं मार्जन सांगतात आश्वलायन परिशिष्ट संपूर्ण सूक्तानें सांगतं व बौधायन 'आपो हि ष्ठा, हिरण्यवर्णा, पावमानी' वगैरे सूक्तांना करावें म्हणतात परंतु 'आपो हि ष्ठा' या तीन ऋचांनी मार्जन करण्याला हरकत नाहीं.

मार्जन करण्याचा उद्देश आरोग्य आणि स्वच्छता ह्याची प्राप्ति हा आहे उदकांत शरीर उत्तम राख शक्ति आहेत हें मार्जनमंत्रात सांगितलें आहे उदकस्नान शरीर निर्मळ आणि शांत होते, ह्याचा सर्वांना अनुभव आहेच, पण कामक्रोधासारखे प्रबल मनोविकारही शीतोदकस्नानाने कमी होतात किंबहुना शांत होतात. काम, क्रोध आणि मदिरादि मादक द्रव्यांचे सेवन ह्यांनी उन्मत्त किंवा मूर्च्छित झालेल्या मस्तकावर दोन चार घागरी थंड पाणी ओतलें तर तो तात्काळ शुद्धीवर येतो प्रबल झालेले काम, क्रोध व मदिरादिक मादक द्रव्यांचा मद, यांची चिकित्सा शीतोदकस्नानाने करावी असे वैद्यशास्त्रही सांगतें उदकांत सर्व औषधी आहेत असे औषधींचा राजा जो सोम त्यानें स्वतः कण्वाला 'अप्सु

मे सोमो अब्रवीत्' (४) ह्या मंत्रात ऋषीला सांगितलें आहे, आणि याच अनुरोधानें, 'अपो याचामि भेषजं,' 'आप. पृणीत भेषजं, (५) ह्या मंत्रानीं आरोग्यकारक औषध द्या, अशी ऋषींनें मागणी केली आहे

ह्यावरून प्रसंगविशेषीं योग्य रीतीनें आचमन, मार्जन, स्नान, पान इ यादि प्रकारानीं उदकाचा उपयोग केला, तर सर्व रोगाचें निवारण होऊन शरार धष्टपुष्ट होईल आणि कामक्रोधादि मनोमलाचही नि सारण होऊन मनही निर्मळ आणि उत्साहसंपन्न होईल ह निर्विवाद आहे. नित्य नियमानें प्रत काळीं शीतोदकस्नान करणाऱ्याच दौर्गध्य, ग्लानि, औदासिन्य, शारीरिक दोष नाहींसे होऊन शरार व मन तरतरीत व उत्साहसंपन्न होत ह्याचा सर्वांना प्रत्यही अनुभव येत असतो

### मन्त्राचमन

मंत्राचमनाचे मंत्रात मन, वाणी, हात, पाय, पोट आणि जननेंद्रियें ह्यांच्या-कडून रात्र पाप होण्याचा संभव आहे, त्या पापाचा,-रात्रीची देवता जो अग्नि म्हणून सूर्य (अग्नि हें सूर्याचेंच रूपांतर आहे) त्यानें नाश करावा अशी प्रार्थना केली आहे म्हणजे आपण पाहिजे तें पातक करावें आणि त्याचा नाश करण्या विषयीं अग्नीची प्राथना करावी म्हणजे सर्व पापाचा नाश होतो, असा त्याचा अथ नाहीं, तर सूर्य हा सर्वसाक्षी आहे, आपण कितीही गुप्तपणें पातक केलें तरी त त्याला समजल्याशिवाय राहणार नाहीं. करिता, त्याचे भय मानून तरी आपल्या इंद्रियांकडून पाप न होऊ देण्याची सावधगिरी ठेवावी, म्हणजे दुराचरणाची प्रवृत्ती उत्तरोत्तर कमी होत जाइल असा त्या मंत्राचा उद्देश आहे.

### अघमर्षण

अघमर्षण म्हणजे पापाचें नि सारण, ज्याच्यापासून पृथिव्यादि पंचमहा-भूतादि हें सच विश्व आणि काल ह उत्पन्न झाले, जो सर्वांचा नियंता असून सर्वांतर्यामी वास करितो, अशा ह्या सत्यसंकल्प विश्वचालकाच्या सान्निध्यानें माझ्या क्रियमाण पापाचा नाश होवो, अशा रीतीनें मंत्राचमनानें पुढें पाप न होऊ न देण्याची खबरदारी घतली आणि अघमर्षणानें संचित पापाचा नाश करून टाकला म्हणजे आपण निष्पाप झाल्यामुळ परमेश्वराचें आराधन करण्यास योग्य झालों.

### अर्घ्यप्रदान

संध्या तीन अर्घ्य देण्याचा प्रघात आहे. तीन किंवा एक अर्घ्य द्यावा अशीं मतें आहेत. 'उद्यन्' (बृहद्यान. १०-२८) या मंत्रानें, किंवा 'चित्र देवानां' वगैरे मंत्रांनींही अर्घ्य देण्याचे विधि आहेत. पण गायत्रीमंत्राला विरोध नाहीं आता ज्याचें आराधन करावयाचें त्याची प्रथम पूजा करून मग ध्यान करावयाचें हें खरें, पण आपण अल्पज्ञ आणि अल्पशक्तिमान् जीव त्या सर्वेश्वराची पूजा ती काय करणार! केवळ त्याच्या मोठेपणाचें चिंतन करून ओंजळभर पाणी त्याला अर्पण करणें इतकेंच त्याची पूजा आपल्याकडून होणें शक्य आहे. हाच अर्घ्यप्रदान करण्याचा उद्देश आहे. म्हणूनच अर्घ्यप्रदान हें संध्येंतील प्रधानकर्म नव्हे, असेंच बहुतेकांचे मत आहे.

'असावादित्यो ब्रह्म' हें संध्येंतील महावाक्य आहे अध्यात्मशास्त्रांत 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यांना सव शास्त्राचं प्रमेय मागून बाकीच्या मंत्रांनीं विस्तृत उहापोह केलेला असतो. तर 'असौ आदित्यो ब्रह्म-' (हा प्रत्यक्ष दिसणारा सूर्य हेंच ब्रह्म) असं संक्षेपानें सांगून गायत्रीमंत्रांत ह्याचंच स्पष्टीकरण केलं आहे.

### आसनविधि

न्यास, ध्यान, मुद्रा, शापविमोचन हे विधि तंत्रांनीं सांगितले आहेत ते वैदिक नाहींत. म्हणून सूत्रांत त्यांचा उल्लेखही नाहीं ध्यानाचं गौडबंगाल तं चमत्कारिकच आहे. ध्यान म्हणजे ज्या देवतेचं चिंतन करावयाचं असेल तिच्या स्वरूपाची कल्पना करितां यावी म्हणून जें वर्णन केलेलं असतें तं, पण त्रिकाल संध्येचीं जीं निरनिराळीं ध्यानं सांगितलीं आहेत (नारायणोपनिषद् किंवा मुक्ताविद्रुम इ०), त्या ध्यानांत निरनिराळ्या प्रकारानीं स्त्रीस्वरूप देवतेचं वर्णन केलेलं आहे.

आता, तात्पर्यत हें सूर्याचेंच ध्यान आहे हें खरें, पण अशा द्राविडी प्राणायामाच्या ध्यानामुळें मुख्य उपास्य देवतेकडे लक्ष न जातां दुसऱ्याच देवतेची कल्पना उत्पन्न होऊन उपासकाचं मन घोटाळ्यांत पडण्याचा मात्र संभव आहे. करितां ध्यान करणंच असेल तर असलं भ्रामक ध्यान न करतां, 'यो देवः सवितास्माकं' हें किंवा अशाच प्रकारचें साक्षात् गायत्रीमंत्रार्थाचें प्रतिपादन करणारें ध्यान करावें.

शापविमोचन म्हणजे कोणा ऋषीचा गायत्रीला शाप झाला, त्यामुळें त्या मंत्राची शक्ति नष्ट झाली, तो हे तांत्रिक उःशाप करून पुन आणणार, ही कल्पनाच हास्यास्पद नव्हे काय ? असो. ह्यावरून ही गोष्ट लक्षात ठेवावी की, इतर कित्येक अवैदिक मतानुयायी लोकांचे प्रयत्न जसे आम्हांस तात्त्विक धर्ममार्गापासून परावृत्त करण्याला कारण झाले आहेत, तसेच किंबहुना त्याहूनही अधिक वैदिक म्हणविणाऱ्या तांत्रिकांचे प्रयत्न आम्हांला वैदिक मार्गापासून परावृत्त करण्याला कारणे झाले आहेत व होत आहेत. करितां तांत्रिकांविषयी फार सावधपणाने वागावें.

卐 卐

## गायत्री मंत्र

### गायत्री जप

गायत्रीजप हेंच संध्येतील प्रधान कर्म, गायत्रीजप म्हणजेच संध्या, इतर सर्व कर्मे संध्येचीं अंग आहेत. गायत्रीमंत्राचा अर्थ पुढे प्रयोगात दिला आहे. त्याचं तात्पर्य असें आहे —

ह्या स्थावरजंगमात्मक संपूर्ण जगाचें उत्पत्ति-स्थिति-लय सूर्यापासूनच होतात. हा स्वयंप्रकाश आहे. म्हणून ह्याच्यापासून प्रकाश आणि उष्णता हीं सर्वांना मिळतात. त्याच्या इच्छेशिवाय झाडाचें पानही हालत नाहीं. त्याच्या प्रेरणेनें आम्हांला कोणतेंही कर्म करण्याची प्रवृत्ति होते सर्य आहे म्हणून जगाचे सर्व व्यवहार यथास्थित चालत आहेत तो नाहींसा होईल तर तत्काल सव जगाचा प्रलय होईल. म्हणून अनन्यभावानें मी सूर्याला शरण जातो.

### गायत्री मंत्राचा तात्त्विक अर्थ

हा भौतिक दृष्टीनें विचार झाला, आणि तो केवळ भौतिकशास्त्राभिमान्यां नाही संमत होईल. आता तात्त्विक दृष्टीनें विचार केला तरी हेंच सिद्ध होतें. अध्यात्मशास्त्रात आत्म्याला सूर्य म्हणतात. हा आत्मरूप सूर्य स्वतन्त्ररूपानें प्राणिमात्राच्या शरीरांत राहून सर्व शरीराला म्हणजे कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, प्राण,

मन, बुद्धि ह्या सर्वांना प्रकाशित करतो. म्हणून आपापल्या कार्याविषयी समर्थ करतो.

## आत्म्याचें स्वरूप

आत्मा सदा जागाच असतो. मन बुद्धि व इंद्रियें हीं निजतात त्यांना तो जागृत करून व्यापारप्रवृत्त करतो. कूटस्थ आत्म्याचें जें प्रतिबिंब आहे त्याला 'जीवात्मा' म्हणतात निद्राकाळीं बुद्धि लीन झाली म्हणजे तोही निजल्या सारखा होतो. बुद्धि जागृत झाली म्हणजे तोही जागृत होऊन व्यवहारदक्ष होतो. जागविणारा हा कूटस्थ आत्मा व जागा होणारा हा जीवात्मा, हें थोड क्यात तात्पर्य आहे. ह्या कूटस्थ आत्म्याच्या प्रेरणेशिवाय कोणी काहीं करू शकत नाहीं.

भौतिक दृष्टीनें आकाशांत दिसणारा सूर्य, आणि अध्यात्मदृष्टीनें शरीरांतील चैतन्यरूप आत्मा हा सर्वेश्वर, सर्वसाक्षी आणि सर्वचालक आहे म्हणून अत यमावान त्याच्याशीं तादात्म्य पावणें म्हणजे मी आत्मरूप आहे अशी भावना दृढ करणें हेंच जीवाचें खरें कर्तव्य आहे

कितीही गुप्तपणें आपण काहीं कर्म केलें तरी तें त्याला समजल्याशिवाय राहणार नाहीं कारण तो सर्वांच्या अंतर्यामीं राहणारा—म्हणून सर्व साक्षी—आहे, हें जाणून निरंतर सदाचरणानें वागावें पापकर्माविषयीं प्रवृत्त होऊं नये

आपले श्वासोच्छ्वासही त्याच्या प्रेरणेशिवाय चालावयाचे नाहींत कारण सर्वांचा प्रेरक तोच आहे. हें जाणून मीपण सोडावा, आणि सर्वांशीं प्रेमानें वागावें, परमेश्वरानें मनुष्याला ज्ञान ही अमूल्य देणगी दिली आहे. म्हणूनच सर्व प्राण्यात मनुष्य हा उच्च प्रतीचा समजला जातो

## ज्ञान देण्याचा उद्देश उपासना

ज्ञान देण्याचा उद्देश हा कीं, मनुष्यानें ह्या जगांतील सर्व खरी तत्त्वें जाणून व शोधून त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें व लोकांना समजवावें बुद्धि ही मनुष्याची अलौकिक शक्ति आहे तिच्या जोरावर मनुष्य काय पाहिजे तें करू शकतो मात्र तो योग्य मार्गानेंच गेल्यास जगाचें कल्याण होईल.

ह्यासाठीं आमच्या पूर्वजानीं मनुष्य साधारण सज्ञान दशेत येताच म्हणजे आठ दहा वर्षांचा होताच प्रथम त्याला संध्येचा उपदेश केला. ह्या संध्येंत वरील प्रश्नाचीं उत्तरें संक्षेपानें पण सुबोध रीतीनें दिलेलीं आहेत. हा उपदेश चांगला ठसावा आणि त्याप्रमाणें त्याचें वर्तन सतत रहावें म्हणून सकाळ संध्याकाळ अशी दिवसातून दोन वेळ ह्याप्रमाणें--' अहरहः सन्ध्यामुपासीत ' म्हणजे प्रतिदिवशीं यावज्जीव संध्या करावी असें शास्त्रानें सांगितलें आहे.

ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे केवळ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, ह्या त्रैवर्णिकांनींच नव्हे तर प्रत्येक मनुष्यमात्रानें देखील संध्या केली पाहिजे असें ठरतें आणि त्या प्रमाणें सर्व लोक करतातही. काल व विधि हे प्रत्येकाचे भिन्न, पण सर्वांचे तात्पर्य एकच आहे.

परमेश्वर हा सर्वज्ञ सर्वसाक्षी सर्वप्रेरक आणि सर्वेश्वर आहे. जीव अल्पज्ञ व अल्पशक्तिमान् अतएव परतंत्र, म्हणून जीवानें निरंतर परमेश्वरोपासनेंतच कृतकृत्यता मानावी. हेंच त्याचें खरें कर्तव्य होय.

卐 卐

**उपस्थान**

'जातवेदसे सुनवाम' (१) ह्या मंत्रात, अग्नि हा मोठा पराक्रमी आहे, म्हणून आम्ही त्याचे भजन करतो, तो आम्हाला सर्व संकटांतून मुक्त करो, अशी अग्नीची प्रार्थना केलेली आहे. अग्नि हें सूर्याचेंच रूपांतर आहे म्हणून अग्नीची प्रार्थना ही पर्यायानें सूर्याची प्रार्थना आहे. पुढील दोन मंत्रांत यज्ञयागादि धार्मिक कर्में करण्यासाठीं आम्हाला सर्व प्रकारें स्वस्थता मिळावी म्हणून सर्व देवतांस वंदन केलें आहे.

दिग्वंदन आणि अभिवादन ही केवळ आचारप्राप्त आहेत. म्हणून दश दिशांना व दिक्पालांना वंदन केल्यानें जगद्रूप परमेश्वरालाच वंदन केलें असें होईल, हा दिग्वंदनाचा हेतु आहे. परमेश्वर जगत् उत्पन्न करून त्याचें पालन पोषण करितो हें खरें, पण तो प्रत्यक्ष दिसत नाहीं आणि मातापितर हे आपल्याला जन्म देऊन पालन-पोषण करितात आणि सन्मार्गास लावितात. अतएव मातापितर ह्याच प्रत्यक्ष दिसणाऱ्या ईश्वराच्या मूर्ति आहेत. अत्यंत नम्रतेनें त्यांना वंदन करावें.

दिग्वंदन आणि अभिवादन हीं आचारप्राप्तच खरीं. पण ह्यापासून घडा उत्तम मिळतो म्हणून तीं अवश्य करावीं. अशी संध्येंत ज्या ज्या गोष्टी कराव्या लागतात त्यांचें समग्रपणें विवेचन केलें. ह्यावरून संध्येंत मुख्य कर्में कोणतीं, अंग कोणतीं, आचार म्हणून करावयाचीं कर्में कोणतीं, करावयास नको कोणतीं, हें सहज लक्षांत येईल.

卐 卐

## सूत्रोक्त संध्या

सूत्रांत निर्दिष्ट केलेला संध्यावंदन विधिही पुढें दिला आहे. त्यांत यज्ञोपवीत धारण केलेलें असावें, मौन धरावें, सायंकाळीं पश्चिम आणि वायव्य ह्यांच्या मधील कोपऱ्याकडे तोंड करून बसावें, आणि प्रातःकाळीं पूर्वेकडे तोंड करून उभें रहावें. सायंकाळीं सूर्याचा अर्धास्त झाल्यापासून नक्षत्र दिसूं लागेपर्यंत

आणि प्रातःकाळी नक्षत्र दिसेनासा झाल्यापासून सूर्यमंडळ दिसू लागेपर्यंत संध्येचे उपासन करावें, इतकी इतिकर्तव्यता सांगून ' नित्योदक सावित्रीं जपेत् ' असें संध्येचें विधान केलें आहे ह्यांत ' सावित्रीं जपेत् ' म्हणजे गायत्री जपावी ही मुख्य संध्या आणि ' नित्योदक ' हें संध्येचें अंग मानावें लागेल. नित्योदक, ह्या शब्दानें मार्जन, मंत्राचमन आणि अघमर्षण हीं समजावीं असें वृत्तिकार म्हणतात आणि तेच खरें आहे. कारण, हींच तीन कर्म संध्येंत उदकसाध्य अशीं आहेत, आचमन हें उदकसाध्य आहे आणि ते संध्येंत चार वेळा करावें लागते, पण इतर कर्मांत जसें करावें लागते तसेंच संध्येंत, संध्येकरितां म्हणून त्याचें विशेष विधान नको. सर्वसाधारण नियमानेंच तें प्राप्त होते.

## अर्घ्यप्रदानाचें महत्त्व

आतां उदकसाध्यकर्मांत शेष राहिलें अर्घ्यप्रदान, आणि पुष्कळ लोकांच्या मतानें संध्येंतील मुख्य कर्म तेंच आहे, किंबहुना अर्घ्यप्रदान म्हणजेच संध्या, असाच सर्वांचा ग्रह झालेला आहे. वेळच्यावेळीं संध्या करणाऱ्या भाविकाची तर त्या अर्घ्यप्रदानावर विशेष श्रद्धा आहे कारणपरत्वें सायंसंध्या करण्याला वेळ न मिळेल, तर निदान अर्घ्य तरी वेळेवर दिले पाहिजेत, अशी त्याचा भाव असतो आणि त्याप्रमाणें ते करितातही.

अर्घ्य देतेवेळीं अंजलींतील उदक एकदम खालीं न सोडतां वर पसरून फेकतात असें केल्यानें त्या उदकाचे बिंदु पुष्कळ होतात आणि त्या प्रत्येक बिंदूचें वज्र होऊन तें सूर्याच्या रथाला प्रतिबंध करणाऱ्या मंदेह* नावाच्या

---

*मंदेह नावाचे हजारों दैत्य आहेत, ते सूर्याच्या रथाला वर येऊं देत नाहींत, म्हणून सूर्योदयाच्या पूर्वी सूर्याला अर्घ्य द्यावें, म्हणजे त्या अर्घ्योदकाच्या प्रत्येक बिंदूचें एक एक वज्र होऊन तें त्या दैत्यांना मारितें. अर्थात् सूर्याचा रथ संकटमुक्त होऊन वर येतो

अशा रीतीनें सूर्याचा रथ संकटमुक्त झाला खरा, पण त्यासाठीं हजारों हत्या केल्याचें पाप आपणास लागलें, त्याच्या निरसनार्थ पृथ्वीप्रदक्षिणा करावी, पण ती रोज सकाळ संध्याकाळ अर्धा दिवसांतून दोन वेळा होणें अगदींच

हजारों दैत्यांना मारितें, अशी त्याची भावना असते आणि ह्याच कारणानें अर्घ्यदानाला प्राधान्य आलेलें आहे.

पण सूत्रांत अर्घ्यप्रदानाचा उल्लेख नाहीं. ह्यावरून सूत्रकाराच्या मतानें अर्घ्यप्रदान करण्याचें कारण नाहीं असें दिसतें. वृत्तिकाराचें मतही असेंच दिसतें. जर त्याला तें अवश्य वाटतें तर ' नित्योदक ह्या सूत्राच्या व्याख्येंत ' आचमनमार्ज्जनादि ' म्हटलें आहे, त्याच ठिकाणीं अर्घ्यप्रदानाचाहि अवश्य उल्लेख आला असता.

卐 卐

## माध्यान्ह संध्या

सूत्रांत सायंसंध्या प्रथम सांगून नंतर ' एवं प्रातः ' असें म्हणून प्रातःसंध्या सांगितली आहे, ह्यावरून अग्निहोत्राप्रमाणें संध्येचाही सायंकालापासून आरंभ सूत्रकारांना इष्ट आहे असें दिसतें आणि हें योग्यही आहे. कारण उपनयन

---

अशक्य असल्यामुळें हा सूर्य परब्रह्मरूप आहे म्हणून त्याला प्रदक्षिणा केल्यानें पृथ्वीप्रदक्षिणा केल्यासारखें होईल. पण हेंही अशक्यच, म्हणून सूर्य हा जसा आकाशांत आहे, तसा तो आपल्या हृदयांतही आहे, अर्थात् आपल्याला प्रदक्षिणा केली म्हणजे सूर्याला प्रदक्षिणा केली असें होईल. म्हणून ' सूर्य हा ब्रह्मरूप आहे ' ह्या अर्थाचा ' असावादित्यो ब्रह्म ' हा मंत्र म्हणून आपल्याभोंवतीं प्रदक्षिणा करावी.

आतां, पृथ्वीप्रदक्षिणा करतेवेळीं समुद्राच्या कांठानें फिरावें, ही न्यूनता दूर करण्यासाठीं प्रदक्षिणा करतेवेळीं आपल्याभोंवतीं पाण्याची धार धरावी म्हणजे समुद्रकांठानें फिरल्यासें होईल अशी कथा पुराणांत व कांहीं स्मृतींतही आहे. ह्या इतिहासाचें तात्पर्य सूर्योदयापूर्वी संध्या करावी इतकेंच आहे. ग्रंथकारांचेंही याविषयीं एकमत नाहीं. कोणी म्हणतात कीं, अर्घ्यप्रदान हें मुख्य आहे. तर कोणी म्हणतात कीं, तें एक अंग आहे. ह्या सर्व मताचा विचार केला म्हणजे अर्घ्यप्रदान मुख्य नाहीं असेंच म्हणणें भाग पडतें.

झाल्यापासून संध्या केली पाहिजे. उपनयन पूर्वाह्णात झाल्यावर पहिला संध्येचा काल येतो तो सायंकालच, म्हणून सायंकालापासून संध्येचा आरंभ सांगितला हें अगदी योग्य आहे.

### माध्याह्न संध्येची अनावश्यकता

आता मध्याह्नकालीं माध्याह्न संध्या म्हणून एक तिसरी संध्या करावी असें कितीएक ग्रंथकार म्हणतात, पण तें सयुक्तिक दिसत नाहीं. कारण सायंकाळ आणि प्रातःकाळ ह्या जशा अहोरात्रीच्या संध्या आहेत, तशी माध्याह्न ही संध्या नाहीं आणि मारून मुटकून मध्यान्हाला जर संध्या म्हणावयाचें असेल तर मध्यरात्रीलाही संध्या म्हणणें भाग पडेल आणि त्या वेळींही संध्या करणें अवश्य होईल. तात्पर्य, सूत्रकारांनीं जर माध्याह्न संध्येचा नामनिर्देशही केला नाहीं तर आश्वलायनांनीं तरी ती करण्याचें मुळींच कारण नाहीं

卐 卐

## संध्यावंदनाचें सद्यःस्वरूप

संध्येतील आचमन व संकल्प हे पारिभाषिक, प्राणायाम हा उपयुक्त, मार्जन, मंत्राचमन, अघमर्षण आणि अर्घ्यदान हीं 'नियोजक.' ह्या सूत्रानें विहित, गायत्रीजप हें प्रधानकर्म, उपस्थान, दिशा व दिक्पाल ह्यांचें वंदन आणि अभिवादन हीं शिष्टाचारप्राप्त, म्हणजे आचमन, प्राणायाम, संकल्प, मार्जन, मंत्राचमन, अघमर्षण, अर्घ्यदान, गायत्रीजप, उपस्थान, दिशा व दिक्पाल यांचें वंदन आणि गुर्वभिवादन इतकीं कर्में केलीं म्हणजे संध्या सांग पूर्ण झाली.

### गायत्री जपाची संख्या

गायत्री जपाच्या संख्येचा उल्लेख नाहीं. तरी संध्येच्या आरंभाची आणि समाप्तीची जी मर्यादा सांगितली आहे तो काल सुमारें दोन अडीच घटका इतका आहे. इतक्या वेळांत सहस्र गायत्री जपही होतो. ज्याला इतका वेळ संध्येकडे खर्च करण्याची सवड नसेल त्यानें थोड्या वेळांतच पण त्यानेंही संध्या अवश्य करावी. गायत्री जपाशिवाय इतर कर्मांस फार तर अर्धी घटका लागते. तेव्हां थोड्या वेळांत संध्या करावयाची असेल तर जपाशिवाय सर्व

क्रमें करून गायत्री जप 'अष्टोत्तरशत', 'अष्टाविंशति' निदान दहा करावा म्हणजे अगदीं थोड्या वेळात पाच सात मिनिटात सध्या होतें

## प्रतिकूल परिस्थितींत करावयाचें सध्यावदन

मात्र सध्योपासना केल्याशिवाय केव्हांही आणि कसाही प्रसग आला तरी राहू नये ज्यावेळीं उक्त न मिटेल किंवा आचमनादि विधि करण शक्य नसत, सध्या करण्याला अयोग्य अशा स्थाना म्हणजे आगगाडीत, आगगाडींत किंवा कारागृहात असू, अथवा दैवगतीन रोगी होऊन निद्रा यावर पडलेले असू तरी यथासभव संध्या केलीच पाहिजे मात्र स्वत त्या स्थितीचा आणि परिस्थितीचा विचार करून व शक्य योग्य तितकच विधि करावे कोणतेचे विधि करण शक्य व योग्य नसल तर गायत्री जप तरी करावा आणि ते ही करण्यापुरती स्वच्छता व योग्यता नसेलतर केवळ मत्राथाच अनुसधान ठेवून परमेश्वराचें ध्यान करावें पण ती वेळ व्यर्थ जाऊ देऊ नये

मात्र अनुकूलता असेल तर सव, निदान साधतील तितके आचमनप्राणायामादि विधि करण्यास आळस करू नये हें लिहिण ज्याला आधुनिक सुधारणेच्या लोकाच वाटेल त्याना आपल्या भारतादि इतिहासाकडे पहावें भारतीय युद्धात जयद्रथवधाच्या दिवशीं सायकाळीं युद्ध न थांबता तसच रात्रींही चाललें होतें या दिवशींची संध्या आपआपल्या ठिकाणीं म्हणजे हत्ती घोडे, रथ इत्यादि ज्या ज्या वाहनावर ते ते बसले होते त्याच ठिकाणी त्यांनी केली असे भारतात लिहिलें आहे तसच प्रद्युम्नाच असुराशीं युद्ध चाललं असता संध्या समय प्राप्त झाला म्हणून त्याच ठिकाणीं तशा स्थितींतच त्यानें संध्या केली (हू ह विष्णुपव अ० ९६), याणखीही अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत विस्तार करण्याच हें स्थळ नाहे

तात्पय संध्येच्या कमाच जस महत्त्व आहे तसेच किंबहुना याहूनही अधिक त्या कालाचें महत्त्व आहे हें विसरतां कामा नये कोणत्याही अपरिहाय कारणानें ती वेळ चुकली तरी मग ती करण्याच कारण नाहीं असा मानयाचा अर्थ नाहीं वेळ चुकली तरी दुसऱ्या संध्येच्या कालापर्यंत ती केलीच पाहिजे आणि तरीही न घडेल तर प्रायश्चित्त केलं पाहिजे

## धर्मशिक्षणाचा ओनामा

वरील विवेचनावरून संध्या ही धर्मशिक्षणाचा ओनामा आहे हें लक्षांत येईल संध्येत धर्माचें उदात्त तत्त्व संक्षेपानें पण सुबोध आणि स्पष्ट रीतीनें दाखविलें आहे जो नियमानें संध्या करीत त्याला धर्मविषयीं आस्था उत्पन्न होईल धर्माची खरी तत्त्वें कळावीं असें त्याला वाटूं लागेल, आणि मग तो त्या दिशेनें प्रयत्न करील पण संध्या करील तर हें सर्व होणार!

## संध्योपासनेतील आधुनिककालीन अवडंबर

कोणत्याहि धर्मकृत्याचें यथार्थ स्वरूप अवडंबरानें नाहींसें होतें, तीच स्थिति संध्येची झाली आहे भस्म, पाट, ताम्हण, पळी, पंचपात्र, स्नान, सोवळें, कालाचा नियम या सर्व गोष्टींनीं लोकांना अगदीं भांबावून सोडलें आहे मुख्य आणि गौण शिस्तीकरिता आणि शोभेकरिता काय आहे याची माहिती नसल्यामुळें संध्येपेक्षा नक्कीपणाकडे मनाचा ओढा वळतो आणि नक्कींत हातीं काहीं न लागल्यामुळें नास्तिकपणाकडे प्रवृत्ति होते

तरी मुख्य कृत्य जो गायत्रीजप म्हणजे उपासना, प्रार्थना, तिकडे लक्ष वेधून इतर उपकरणाचा फापटपसारा सर्वांच्या लक्षांत भरला पाहिजे. शुचिर्भूतपणा हा सर्वच धर्मकृत्यांत आवश्यक आहे, आणि तो शक्य त्या तऱ्हेनें पाळला तर धर्मकृत्यापासून उत्पन्न होणाऱ्या मानसिक समाधानांत भर पडणारी आहे त्यापासून काय फायदा आहे हें सांगण्याची येथ जरूरी नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें इतकेच कीं प्रत्येकानें साधनांच्या पसाऱ्यांत घोटाळून न जाता उपासनेच्या कार्यांत क्षमीपणा उत्पन्न करता उपयोगी नाहीं.

卐 卐 卐

# सन्ध्यावंदन विधि

## अनुक्रम

१ आचमन
२ प्राणायाम
३ सङ्कल्प
४ मार्जन
५ मन्त्राचमन
६ द्वितीय मार्जन
७ अघमर्षण
८ अर्घ्यप्रदान
९ आसनविधि
१० न्यास
११ ध्यान
१२ गायत्री जप
१३ उपस्थान
१४ गोत्रप्रवर उच्चारण आणि अभिवादन

# सूर्यनमस्कार

संकल्पः- आचम्य। श्री सविता सूर्यनारायणदेवताप्रीत्यर्थं एकाहृत्या सूर्यनमस्कारान् करिष्ये॥

ध्यानम्:- ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ति,
नारायणः सरसिजासनसंनिविष्टः।
केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी,
हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः॥

१ ॐ मित्राय नमः॥
२ ॐ रवये नमः॥
३ ॐ सूर्याय नमः॥
४ ॐ भानवे नमः॥
५ ॐ खगाय नमः॥
६ ॐ पूष्णे नमः॥
७ ॐ हिरण्यगर्भाय नमः॥
८ ॐ मरीचये नम॥
९ ॐ आदित्याय नमः॥
१० ॐ सवित्रे नमः॥
११ ॐ अर्काय नमः॥
१२ ॐ भास्कराय नमः॥

ॐ श्री सवितृसूर्यनारायणाय नमः॥

प्रार्थना:- आदित्यस्य नमस्कारम् ये कुर्वंति दिने दिने।
जन्मांतरसहस्रेषु दारिद्र्यं नोपजायते॥

तीर्थग्रहणम्:-अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम्॥
सूर्यपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम्॥

अनेन सूर्यनमस्काराख्येन कर्मणा भगवान् सूर्यनारायणः प्रीयताम्॥

## संध्यावदन विधि·



### १. आचमनम्

ॐ केशवाय नम ।
ॐ नारायणाय नम ।
ॐ माधवाय नम ।
ॐ गोविन्दाय नम ।
ॐ विष्णवे नम ।
ॐ मधुसूदनाय नम ।
ॐ त्रिविक्रमाय नम ।
ॐ वामनाय नम ।
ॐ श्रीधराय नम ।
ॐ हृषीकेशाय नम ।
ॐ पद्मनाभाय नम ।
ॐ दामोदराय नम ।
ॐ सङ्कर्षणाय नम ।
ॐ वासुदेवाय नम ।
ॐ प्रद्युम्नाय नम ।
ॐ अनिरुद्धाय नम ।
ॐ पुरुषोत्तमाय नम ।
ॐ अधोक्षजाय नम ।
ॐ नारसिंहाय नम ।
ॐ अच्युताय नम ।
ॐ जनार्दनाय नम ।
ॐ उपेन्द्राय नम ।
ॐ हरये नम ।
ॐ श्रीकृष्णाय नम ।

## २. प्राणायामः

प्रणवस्य परब्रह्म ऋषि । परमात्मा देवता । दैवी गायत्री छन्द । सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्र जमदग्नि–भरद्वाज–गौतमात्रि–वसिष्ठ–

---

## १. आचमन

पहिल्या तीन नावानीं एक एक पळी पाणी उजव्या तळहातावर घेऊन प्राशन करावें, चवथ्या नावानें हात धुवावेत

आचमन म्हणजे उदक प्राशन करणें. आचमन अनेक प्रकारचें आहे आणि आचमनाच्या पद्धतीही अनेक आहेत. सर्वप्रसिद्ध पद्धति वर दिली आहे.

आचमन करतेवेळीं गोकर्णाकृति हातानें उदक घेऊन ब्रह्मतीर्थानें आचमन करावें ( आंगठा आणि आंगठ्याजवळील बोट याचा संयोग करून बाकीचीं तीन बोटें लांब केलीं असतां गोकर्णाकृति होते. तसेंच आंगठ्याचा आरंभ अथवा तळहाताच्या आरंभाचा मध्य याला ब्रह्मतीर्थ म्हणतात. )

मध्यावंदनादि सर्व धार्मिक कृत्याला तांब्याचें भांडें, निरनिराळी पळी तांब्याची असावी. आचमन थंड पाण्यानें करावें ऊन पाण्यानें करूं नये केस, नख, माती, बुडबुडे वगैरेनी युक्त असलेलें व डाव्या हातानें आणलेलें पाणी अशुद्ध समजावें प्रत्येक आचमनाला वेगळी पळी भरून पाणी घ्यावें.

## २. प्राणायाम

प्राण म्हणून श्वासवायु व आयाम म्हणजे निरोध. श्वासवायुच्या निरोधाला प्राणायाम म्हणतात प्रणव म्हणजे ओंकार, त्याचा परब्रह्म हा ऋषि, परमात्मा ही देवता आणि गायत्री हा छंद होय. भूः, भुवः, स्वः महः, जनः, तपः, सत्य हा सात व्याहृती होत

यांचे अनुक्रमें विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, आणि कश्यप हे ऋषि, अग्नि, वायु, आदित्य, बृहस्पति, वरुण, इंद्र आणि विश्वेदेव

ॐ तत्सवितुर्वरेण्यं, भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् ॥ १ ॥
ॐ आपो ज्योतिरसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवः स्वरोम् ॥ २ ॥

## ३. संकल्पः

ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं संध्योपास्तिं करिष्ये ।

## ४ मार्जनम्

आपोहिष्ठेति तृचस्याम्बरीष सिंधुद्वीप ऋषि । आपो देवता । गायत्री छन्द । मार्जने विनियोग ।

---

## ३. संकल्प

संकल्प म्हणजे जें काय करावयाचें व ज्याकरिता करावयाचें, त्याचा उच्चार करून उदक सोडणें म्हणजे एक प्रकारची प्रतिज्ञा करणें मागच्या संध्योपासन या वेळेपर्यंत माझ्याकडून घडलेल्या पातकांचा नाश होऊन परमेश्वराची प्राप्ति व्हावी म्हणून मी उपासना करतो

## ४ मार्जन

मार्जन म्हणजे शुद्ध करणे येथे मस्तकावर पाणी शिंपडून आपणास शुद्ध करावयाचे आहे. मार्जन मंत्राच्या शेवटी करावें 'आपोहिष्ठा' हे तीन मंत्र आहेत परंतु येथे त्यांचे 'पच्छ म्हणजे नऊ भाग करून प्रत्येक पादाचे शेवटी मार्जन करावें

---

(१) जो सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो, त्याच्या सर्वश्रेष्ठ तेजाची मी उपासना करतो (ऋ ३ ६२ १०)

(२) जल, तेज, मधुरादि रस आणि अमृत हे ब्रह्म आहे भू, भुव स्व हे सर्व ब्रह्मच आहे (नारायणोपनिषद् ३५ अनुवाक)

ॐ आपो हि ष्ठा मयोभुवः ।
ता न ऊर्जे दधातन ।
महे रणाय चक्षसे ॥
यो वः शिवतमो रसः ।
तस्य भाजयतेह नः ।
उशतीरिव मातरः ॥
तस्मा अरं गमाम वः ।
यस्य क्षयाय जिन्वथ ।
आपो जनयथा च नः ॥ ३ ॥

卐 卐

'आपोहिष्ठा' या मंत्राचा आंबरीषकुलोत्पन्न सिंधुद्वीप हा ऋषि, आप ही देवता व गायत्री हा छंद होय. यांनी मार्जन करावें

(३) हे उदकांनो, ज्या अर्थी तुम्ही (स्नानपानादिकांनी) सुखदायक आहात, त्या अर्थी अन्न आणि पवित्र व रमणीय अशा आत्मज्ञानाकरिता आमचें रक्षण करा. आपल्या बालकाचें कल्याण इच्छिणाऱ्या माता ज्याप्रमाणें बालकास स्तनपान करवितात, त्याप्रमाणें तुम्ही आपला कल्याणकारक रस आम्हाला द्या. हे उदकांनो, ज्यांचा (रोगाचा) नाश झाला असतां आम्हाला आनंद होईल, त्याच्या नाशाकरितां आम्ही तुमचा स्वीकार करितों आम्हाला समर्थ करा (ऋ. १०.९).

卐 卐

## ५. मंत्राचमनम्

सूर्यश्चेति मन्त्रस्य ब्रह्मा ऋषि । सूर्यमन्युमन्युपतिरात्रयो देवता । प्रकृतिश्छन्दः । मन्त्राचमने विनियोगः ।

ॐ सूर्यश्च(अग्निश्च) मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः ।
पापेभ्यो रक्षन्ताम् ।
यद्राज्या ( यदह्ना ) पापमकार्षम् ।
मनसा वाचा हस्ताभ्याम् ।
पद्भ्यामुदरेण शिश्ना ।
रात्रिस्तदवलुम्पतु (अहस्तदवलुम्पतु) यत्किंच दुरितं मयि ।
इदमहं माममृतयोनौ ।
सूर्ये (सत्ये) ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ ४ ॥

## ५. मंत्राचमन

' सूर्यश्च ' या मंत्राच्या सूर्य, मन्यु, मन्युपति व रात्रि या देवता, प्रकृति हा छंद, मंत्राचमनाकडे उपयोग

' मंत्राचमन ' म्हणजे तळहातावर पाणी घेऊन ' सूर्यश्च ' या मंत्राने तें प्राशन करणें. पाप नाहीसें करणें हा या मंत्राचमनाचा मुख्य उद्देश आहे.

' सूर्यश्च ' हा मंत्र म्हणून मंत्राचमन करावें व नंतर आचमन करावें.

---

( ४ ) सूर्य आणि क्रोध नाहीसा करणारा विवेक यानीं मी क्रोधाधीन होऊन केलेल्या पातकापासून माझें संरक्षण करावें. मन, वाणी हात, पाय, पोट आणि जननेंद्रिय यांना गत्या रात्रीत जें मी पातक केलें असेल, त्याचा रात्रीनें म्हणजे रात्रीची देवता जो अग्नि ( म्हणजे पर्यायानें सूर्य ) त्यानें नाश करावा. इतकेंच नव्हे जें पातक माझ्या ठिकाणीं शिल्लक राहिलें असेल त्याचा नाश करण्याकरितां मी सूर्याची उपासना करतों ( नारायणोपनिषद् १२ अनु. )

## ५. द्वितीयमार्जनम्

(केशवाय नमः श्रीकृष्णाय नमः) प्रणवस्य परब्रह्म ऋषिः। परमात्मा देवता। दैवी गायत्री छन्दः।

व्याहृतीनां प्रजापतिर्ऋषिः। प्रजापतिर्देवता। बृहती छन्दः।

गायत्र्या विश्वामित्र ऋषिः। सविता देवता। गायत्री छन्दः। गायत्रीशिरसः प्रजापतिर्ऋषिः। ब्रह्माग्निवाय्वादित्या देवता। यजुश्छन्दः। प्राणायामे विनियोगः।

तत्स॒वि॒तुर्वरे॑ण्यं॒, भर्गो॑ दे॒वस्य॑ धीमहि।

धियो॒ यो नः॑ प्रचो॒दया॑त्।

ॐ आपो॒ ज्योति॒ रसो॒ऽमृतं॒, ब्रह्म॒ भूर्भुवः॒ स्व॒रोम्॥ ५॥

## ६. द्वितीयमार्जन

प्रणव म्हणजे ॐकार. त्याचा परब्रह्म हा ऋषि, परमात्मा ही देवता, गायत्री हा छंद होय. भूः भुवः स्वः या तीन व्याहृतींचा प्रजापति हा ऋषि, प्रजापति देवता, बृहती छंद होय. गायत्रीचा विश्वामित्र ऋषि, सूर्य देवता, गायत्री छंद होय. गायत्रीशिराचा प्रजापति ऋषि, ब्रह्मा, अग्नि, वायु आणि आदित्य ह्या देवता आणि यजु हा छंद होय. नऊ ऋचा असणा या 'आपोहिष्ठा' या मंत्राचा अंबरीषपुत्र सिंधुद्वीप हा ऋषि, उदक देवता, गायत्री हा छंद होय. पण पाचवी ऋचा वर्धमाना गायत्री, सातवी प्रतिष्ठा गायत्री, आणि आठ व नऊ ह्या ऋचा अनुष्टुभ् छंदाच्या आहेत. या मंत्रांनी मार्जन करावें.

(५) व्याहृती दोन प्रकारच्या आहेत, एक 'भूः भुवः स्वः महः' इत्यादि सात आणि 'भूः भुवः स्वः' या तीन. पहिल्यांना समस्त व्याहृती व दुसऱ्यांना महा व्याहृती असें म्हणतात. प्रजापति ऋषि, प्रजापति देवता व बृहती छंद ही समस्त व्याहृतींची ऋषिदैवतें होत.

आपोहिष्ठेति नवर्चस्य सूक्तस्याम्बरीष सिंधुद्वीप ऋषि । आपो देवता । गायत्री छन्द । पचमी वर्धमाना सप्तमी प्रतिष्ठा । अन्त्ये द्वे अनुष्टुभौ । मार्जने विनियोग ।

ॐ आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन ।
महे रणाय चक्षसे ॥
यो नः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः ।
उशतीरिव मातरः ॥
तस्मा अरं गमाम वो, यस्य क्षयाय जिन्वथ ।
आपो जनयथा च नः ॥
शं नो देवीरभिष्टय,
आपो भवन्तु पीतये ।
शं योरभि स्रवन्तु नः ॥
ईशाना वार्याणां क्षयन्तीश्चर्षणीनाम् ।
अपो याचामि भेषजम् ॥

---

(६) उदकदेवता आम्हास सुख देवोत आम्हास आरोग्यकारक उदक पिण्यास मिळो आणि रोग व भवर्पण याची भीति नाहीशी करणारे उदकाचे प्रवाह आम्हाला पवित्र करोत

रोग निवारण करणाऱ्या, आरोग्यादि देण्यास समर्थ असणाऱ्या आणि भूतमात्रास आधारभूत अशा उदकांच्याजवळ मी औषधीची याचना करतो उदकात सर्व औषध आणि सर्व जगताला सुख देणारा अग्नि आहे असे सोमाने मला सांगितले हे उदकांनो, मी दीर्घायुषी होऊन चिरकाळ सूर्यास पाहाण्याला समर्थ होण्याकरिता माझ्या शरीरात औषधांचा पुरवठा करा. हे उदकांनो

अप्सु मे सोमो अब्रवीदुंतर्विश्वानि भेषुजा ।
आग्निंच विश्वशंभुवं ॥
आपः पृणीत भेषुजं । वरूथं तुन्वे३ ममं ।
ज्योक्च सूर्यं दृशे ॥
इदमांपः प्रवंहत ।
यत्किंचं दुरितं मयिं ।
यद्वाहमंभिदुद्रोह ।
यद्वां शेप उतानृंतम् ॥
आपो अद्यान्वंचारिषम् ।
रसेंन समर्गस्महि ॥
पयस्वानग्न आगंहि ।
तं मा संसृंज वर्चसा ॥ ६ ॥

卐 卐

---

माझ्या ठिकाणीं जें कांहीं पाप असेल, मी बुद्धिपूर्वक कोणाचा द्रोह केला असेल अथवा जें कांहीं व्यर्थ शिव्या-शाप दिले असतील तें सर्व वाहून-धुवून नेण्या हे उदकानो, आज मी तुमची उपासना केली आहे आणि तुमच्या सारभूत अशा तत्त्वाशीं संयुक्त झालों आहें ! हे अग्ने, जलदेवतेबरोबर असणारी तू ये आणि मला तेज संपन्न कर (ऋ. १० ९).

卐 卐

## ७. अघमर्षणम्

ऋत चेति तृचस्य अघमर्षण ऋषिः । भाववृत्त देवता । अनुष्टुप् छन्दः । अघमर्षणे विनियोगः ।

ॐ ऋतं च सत्यं चाभीद्धात्, तपसोऽध्यजायत ।
ततो रात्र्यजायत, ततः समुद्रो अर्णवः ।
समुद्रादर्णवादधि, संवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधद्, विश्वस्य मिषतो वशी ॥
सूर्याचन्द्रमसौ धाता, यथापूर्वमकल्पयत् ।
दिवं च पृथिवीं च, अन्तरिक्ष मथो स्वः ॥ ७ ॥

卐 卐

---

## ७. अघमर्षण

अघ म्हणजे पाप (शरीरात पापपुरुष) त्याचे मर्षण म्हणजे नि सारण करणें, याला अघमर्षण असे म्हणतात.

'ऋत' च ह्या तीन ऋचांचा अघमर्षण हा ऋषि, अर्थही देवता व अनुष्टुभ् हा छंद. अघमर्षणाकरिता उपयोग

अपत्रामन्तु भूतानि पिशाचा सर्वतो दिशम् ।
सर्वेषामविरोधेन ब्रमकर्म समारभ ॥ ११ ॥

## १०. न्यासः

गायत्र्या विश्वामित्र ऋषि । सविता देवता । गायत्री छन्द । न्यासे विनियोग ॥

ॐ तत्सवितुर्हृदयाय नम । वरेण्य, शिरसे स्वाहा । भर्गो देवस्य, शिखायै वषट् । धीमहि, कवचाय हुम् । धियो यो न , नेत्रत्रयाय वौषट् । प्रचोदयात् , अस्त्राय फट् ।

卐 卐

## १०. न्यास

वर लिहिल्याप्रमाण गायत्री मत्राचे ते ते भाग म्हणून शरीराच्या त्या त्या भागाला स्पर्श करावा. तत्सवितु ' असे म्हणून हृदयास स्पर्श करावा ' वरेण्य ' असे म्हणून डोकीला स्पर्श करावा ' धीमहि ' असे म्हणून सर्व शरीराला कवच घातल्याची कल्पना करावी ' धियो यो न ' म्हणून डोळ्याना स्पर्श करावा. ' प्रचोदयात ' असें म्हणून टाळी वाजवून सर्व दिशा शुद्ध केल्या असे समजावें गायत्री मत्राचा तो तो भाग देवता म्हणून शरीराच्या त्या त्या भागाचे ठिकाणी स्थापन करून सर्व शरीर देवतामय केले, व जपाकरिता सर्व दिशा शुद्ध केल्या अशी यांत कल्पना आहे

न्यास हा वैदिक नसून तत्रोक्त आहे, म्हणून तो करू नये असे अनेक विद्वानाचे म्हणणें आहे, परतु आश्वलायन गृह्यपरिशिष्टात न्यासविधायक उल्लेख आहे

卐 卐

सर्वांच्या अनुकूलतेने ब्रह्मकर्माला आरभ करतो

ॐ असावादित्यो ब्रह्म ॥ ९ ॥

卐 卐

## ९. आसनविधिः

( आचम्य प्राणानायम्य )

पृथ्वीति मन्त्रस्य मेरुपृष्ठ ऋषिः । कूर्मो देवता । सुतलं छन्दः । आसने विनियोगः ॥

ॐ पृथ्वि त्वया धृता लोका,
देवि त्वं विष्णुना धृता ।
त्वं च धारय मा देवि,
पवित्रं कुरु चासनम् ॥ १० ॥
अपसर्पन्तु ते भूता, ये भूता भूमिसंस्थिताः ।
ये भूता विघ्नकर्तारस्ते नश्यन्तु शिवाज्ञया ॥

---

' असावादित्यो ' हा मंत्र म्हणून आपल्या भोवती उदकाची धार धरून प्रदक्षिणा करावी. नंतर दोनदां आचमन आणि प्राणायाम करावा.

卐 卐

## ९. आसनविधि

' पृथ्वी ' या मंत्राचा मेरुपृष्ठ ऋषि, कूर्म देवता आणि सुतल छंद. आसनाविधीकडे विनियोग. आसनविधि आश्वलायन परिशिष्टातही नाहीं, तथापि प्रचारात फार म्हणून दिला आहे.

---

( ९ ) सत्य म्हणजे हा प्रत्यक्ष दिसत असलेला सूर्यच ब्रह्म आहे.

( १० ) हे पृथ्वी देवि, तूं या भू, भुंवः, स्वः इत्यादि तीन लोकांचें धारण केलें आहेस आणि तुला विष्णूनें धारण केलें आहे. हे देवि, आपल्या ठिकाणीं मला आश्रय देऊन माझें आसन पवित्र कर.

( ११ ) भूतें पसार होवोत आणि पिशाच्चें सर्व दिशांना जावोत. मी

अपक्रामन्तु भूतानि पिशाचा: सर्वतो दिशम्।
सर्वेषामविरोधेन ब्रह्मकर्म समारभे ॥ ११ ॥

## १०. न्यास:

गायत्र्या विश्वामित्र ऋषि: । सविता देवता । गायत्री छन्द: । न्यासे विनियोग: ॥

ॐ तत्सवितुर्हृदयाय नम: । वरेण्य, शिरसे स्वाहा । भर्गो देवस्य, शिखायै वषट् । धीमहि, कवचाय हुम् । धियो यो न , नेत्रत्रयाय वौषट् । प्रचोदयात् , अस्त्राय फट् ।

卐 卐

## १०. न्यास

वर लिहिल्याप्रमाणें गायत्री मंत्राचे ते ते भाग म्हणून शरीराच्या त्या त्या भागाला स्पर्श करावा. 'तत्सवितु' असें म्हणून हृदयास स्पर्श करावा. 'वरेण्य' असें म्हणून शेंडीला स्पर्श करावा. 'धीमहि' असें म्हणून सर्व शरीराला कवच घातल्याची कल्पना करावी. 'धियो यो न' म्हणून डोळ्यांना स्पर्श करावा. 'प्रचोदयात' असें म्हणून टाळी वाजवून सर्व दिशा शुद्ध केल्या असें समजावें. गायत्री मंत्राचा तो तो भाग देवता म्हणून शरीराच्या त्या त्या भागाचे ठिकाणीं स्थापन करून सर्व शरीर देवतामय केले, व जपाकरिता सर्व दिशा शुद्ध केल्या अशी यांत कल्पना आहे.

न्यास हा वैदिक नसून तंत्रोक्त आहे, म्हणून तो करू नये असें बहुतेक विद्वानांचे म्हणणें आहे, परंतु आश्वलायन गृह्यपरिशिष्टांत न्यासविधायक उल्लेख आहे.

卐 卐

सर्वांच्या अनुज्ञेने ब्रह्मकर्माला आरंभ करतों.

## ११. ध्यानम्

आगच्छ वरदे देवि, जपे मे सन्निधौ भव
गायन्त त्रायसे यस्मात्, गायत्री त्व ततः स्मृता ।
यो देवः सवितास्माकं, धियो धर्मादिगोचरे ।
प्रेरयेत्तस्य तद्भर्गस्तद्वरेण्यमुपास्महे ॥१२॥

卐 卐

## १२. गायत्री जप

प्रणवस्य परब्रह्म ऋषिः । परमात्मा देवता । गायत्री छन्दः । समस्तव्याहृतीनां प्रजापतिर्ऋषिः । प्रजापतिर्देवता । बृहती छन्दः । गायत्र्या विश्वामित्र ऋषिः । सविता देवता । गायत्री छन्दः । जपे विनियोगः ।

---

## ११. ध्यान

ज्या देवतेचे ध्यान करावयाचें तिचे स्वरूप मनात आणावें. ध्यानाचा श्लोक गायत्रीमंत्राच्या अर्थाचा आहे.

卐 卐

## १२. गायत्री जप

नंतर ऋषि, देवता, छंद म्हणून अष्टोत्तरशत (१०८) अष्टाविंशति (२८) किंवा दश (१०) यांपैकी शक्य तेवढा जप करावा. गायत्री मंत्राचा अर्थानुसंधानपूर्वक मनातल्या मनात उच्चार करावा.

---

(१२). हे वर देणारे देवी ये, तू माझ्या जपस्थानीसमीप असावेस. तुझी स्तुति करणाराचें तू संरक्षण करितेस, म्हणून तुला गायत्री म्हणतात. जो सूर्यदेव आमच्या बुद्धीला धर्म इ० प्रवृत्त करितो त्याच्या सदश्रेष्ठ तेजाची मी उपासना करितो.

ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।
धियो यो नः प्रचोदयात्॥ १३॥

फ फ

## १३. उपस्थानम्

(१) जातवेदसे इति मंत्रस्य मारीच कश्यप ऋषिः। अग्निर्देवता॥ त्रिष्टुप् छन्दः। उपस्थाने विनियोगः।

ॐ जातवेदसे सुनवाम सोमं, मरातीयतो नि दहाति वेदः।
स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा, नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः॥१४॥

---

गायत्रीमंत्राची पदे—तत् सवितुः वरेण्यम् भर्गः देवस्य धीमहि। धियः यः नः प्रचोदयात्।

अन्वय —सवितुः देवस्य तत् वरेण्यं भर्गः धीमहि। यः नः धियः प्रचोदयात्

फ फ

## १३. उपस्थान

उपस्थान म्हणजे स्तुति-प्रार्थना.

(१) 'जातवेदसे' या मंत्राचा मारीच कश्यप हा ऋषि, अग्नि देवता आणि त्रिष्टुप हा छंद होय.

---

(१३) जो सूर्यदेव आमच्या बुद्धीला धर्माकडे प्रवृत्त करितो त्याच्या सर्वश्रेष्ठ तेजाची मी उपासना करतो

(१४) जातवेद नावाच्या अग्नीसाठी आम्ही सोम कुटून तयार करतो तो

(२) तच्छंयोरिति मन्त्रस्य शंयुर्ऋषिः । विश्वेदेवा देवता: । शक्वरी छन्दः । उपस्थाने विनियोगः ।

ॐ तच्छंयोरावृणीमहे, गातुं यज्ञाय, गातुं यज्ञपतये, दैवीः स्वस्तिरस्तु नः, स्वस्तिर्मानुषेभ्यः ।

ऊर्ध्वं जिगातु भेषजं ॥

शं नो अस्तु द्विपदे, शं चतुष्पदे ॥ १५ ॥

(३) नमो ब्रह्मण इति मन्त्रस्य प्रजापतिर्ऋषिः । विश्वेदेवा देवता: । जगती छन्दः । उपस्थाने विनियोगः ।

ॐ नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नये
नमः पृथिव्यै नमो ओषधीभ्यः ।
नमो वाचे नमो वाचस्पतये
नमो विष्णवे महते करोमि ॥ १६ ॥

---

(२) 'तच्छंयो' या मन्त्राचा शंयु हा ऋषि, तत्प्रतिपादित विषय देवता आणि शक्वरी हा छन्द होय.

(३) 'नमो ब्रह्मणे' ह्या मन्त्राचा प्रजापति हा ऋषि, अनेक देवता आणि जगती हा छन्द होय.

---

आणि आमच्या शत्रूंना नाश करो व भोगण्यास कठीण अशा सर्व दुःखापासून आम्हांला मुक्त करो. नंतर नदीला तारतात तसे ह्या अग्नीच्या साहाय्याने आम्ही सर्व दुःखांना तरू (ऋ. १.९९.१)

(१५) यज्ञ आणि यज्ञपति यांची स्तुति करण्यासाठी आम्ही आरोग्याची याचना करतो. देवांपासून आणि मनुष्यापासून आमचे कल्याण होवो. आमचा द्विपाद परिवार आणि पशु यांचे कल्याण असो. (ऋग्वेद. बाष्कलशाखा.)

(१६) सर्वान्तर्यामी ब्रह्म, अग्नि, पृथिवी, ओषधी, वाक्, वाचस्पति, आणि

## १४. दिग्वन्दनम्–देवतावन्दनम्

प्राच्यै दिशे इन्द्राय च नम । आग्नेय्यै दिशे अग्नये च नम । दक्षिणायै दिशे यमाय च नम । नैर्ऋत्यै दिशे निर्ऋतय च नम । प्रतीच्यै दिशे वरुणाय च नम । वायव्यै दिशे वायवे च नम । उदीच्यै दिशे सोमाय च नम । ईशान्यै दिशे इश्वराय च नम । ऊर्ध्वायै दिशे ब्रम्हणे च नम । अधरायै दिशे अनताय च नम ।

सध्यायै नम । गायत्र्यै नम । सावित्र्यै नम । सरस्वत्यै नम । सर्वाभ्यो देवताभ्यो नम ॥ १७ ॥

卐 卐

---

## १४. दिग्वंदन आणि देवतावंदन

दिशाना 'वन्दन' म्हणजे नमस्कार दिशाबरोबर दिशाचे अधिपति दे ॰ यानाही नमस्कार सागितला आहे.

卐 卐

---

सर्वव्यापक महाविष्णु याना मी नमस्कार करतों ( आश्वलायन गृह्यसूत्र )

( १७ ) पूर्व दिशा आणि इन्द्र याना नमस्कार असो. आग्नेयी दिशा आणि अग्नि याना नमस्कार असो दक्षिण दिशा आणि यम यांना नमस्कार असो नैऋती दिशा आणि निऋति देवत' याना नमस्कार असो पश्चिम दिशा आणि वरुण याना नमस्कार असो वायव्य दिशा आणि वायु याना नमस्कार असो. उदीचि दिशा आणि सोम याना नमस्कार असो ऊर्ध्व दिशा आणि ब्रह्मा यांना नमस्कार असो अधर आणि अनत यांना नमस्कार असो

संध्या, गायत्री, सावित्री सरस्वती आणि सर्व देवता यांना नमस्कार असो

## १५. गोत्रप्रवरोच्चारणम्–अभिवादनम्

अमुकप्रवरान्वित — अमुकगोत्रोत्पन्न — ऋग्वेदस्याश्वलायन-सूत्रशाकलशाखाध्यायी अमुकशर्माऽहं भो गुरो त्वामभिवादये ।

卐 卐

अनेन प्रातःसंध्यावंदनेन श्रीपरमेश्वरः प्रीयताम् । ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु । द्विराचमनम् ।

॥ इति संध्या संपूर्णा ॥

卐 卐 卐

---

## १५. गोत्रप्रवर–उच्चारण आणि अभिवादन

नाक्षत्र नाव म्हणजे जन्मनक्षत्रावरून ठेवलेले नाव. ते उच्चारून हे गुरो, तुम्हाला नमस्कार करतो असे म्हणावें.

卐 卐

ह्या संध्यावंदनकर्माने परमेश्वर प्रसन्न होवो. हे कर्म ईश्वराला अर्पण असो. शेवटी द्विराचमन करावें.

द्विराचमनाचा संध्येत तीन ठिकाणी प्रसंग पडतो, एक आरंभी अर्घ्यदानानंतर आणि शेवटी. आचमनातील पहिली तीन नावें दोनदा म्हणून पुढील एकवीस नावें एकदाच म्हणावयाची याला 'द्विराचमन' असे म्हणतात.

येथे संध्या संपूर्ण झाली.

卐 卐 卐

## परिशिष्ट १

# स्नान करताना म्हणावयाचे श्लोक

卐

गंगे च यमुने चैव, गोदावरि सरस्वति ।
नर्मदे सिंधु कावेरि, जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ॥

नमामि गंगे तव पादपंकजं, सुरासुरैर्वन्दितदिव्यरूपम् ।
भुक्तिं च मुक्तिं च ददासि नित्यं, भवानुसारेण सदा नराणाम् ॥

गंगा गंगेति यो ब्रूयात्, योजनानां शतैरपि ।
मुच्यते सर्वपापेभ्यो, विष्णुलोकं स गच्छति ॥

गंगाद्वारे कुशावर्ते, बिल्वके नीलपर्वते ।
स्नात्वा च कनखले तीर्थे, पुनर्जन्म न विद्यते ॥

पापोऽहं पापकर्माऽहं, पापात्मा पापसंभव ।
त्राहि मां कृपया गंगे, सर्वपापहरा भव ॥

卐 卐 卐

## परिशिष्ट....२
## भोजनविधि

### १. भोजनारंभे

ॐ सत्य त्वर्तेन परिषिंचामि ॥

१ चित्राय स्वाहा । २ चित्रगुप्ताय स्वाहा । ३ यमाय स्वाहा । ४ यमधर्माय स्वाहा । ५ सर्वेभ्यो भूतेभ्यः स्वाहा ॥

अमृतोपस्तरणमसि ॥

१ ॐ प्राणाय स्वाहा । २ ॐ अपानाय स्वाहा । ३ ॐ व्यानाय स्वाहा । ४ ॐ उदानाय स्वाहा । ५ ॐ समानाय स्वाहा । ६ ॐ ब्रह्मणे स्वाहा । ब्रह्मणिमात्मानममृतत्वाय ।

### २. भोजनान्ते

अमृतापिधानमसि ॥

---

### १. भोजनाच्या प्रारंभी

भोजनाचे सर्व पदार्थ वाढलेलें पात्र पुढें घेऊन डाव्या हातास पाण्याचें भाडें ठेवावें. उजव्या हातात पळीनें पाणी घेऊन डाव्या बाजूकडून पात्राच्या भोंवतीं फिरावें. नतर फिरविलेल्या पाण्यावर तीन, पाच किंवा त्याप्रमाणें आचार असेल त्याप्रमाणें वरून खालीं उजव्या बाजूस आवळ्या येवढ्या आहुती घालाव्यात. त्यावर पाणी फिरवून त्या गोळा कराव्यात आणि नतर 'अमृतोपस्तरणमसि' या मत्रानें पळीभर पाणी उजव्या हातावर घेऊन त्यावकाश प्राशन करावें.

नतर 'प्राणाय स्वाहा' वगैरेंनीं क्रमानें पाच आहुति भात किंवा जें अन्न असेल त्याच्या घ्याव्यात. एक गिळल्याशिवाय दुसरी घेऊ नये. नतर डोळ्याला व उजव्या हाताला पाणी लावून भोजनास आरंभ करावा.

### २. भोजन संपल्यावर

भोजन संपल्यावर 'अमृतापिधानमसि' या मत्रानें पळीभर पाणी हातावर घेऊन प्राशन करावें. तोंपर्यंत पात्रावरून उठू नये. आहुतींकरिता घ्यावयाचें अन्न तूप घालून घ्यावें.

卐 卐 卐

## परिशिष्ट ३

# भोजनापूर्वी म्हणावयाची प्रार्थना आणि संकल्प

५

१ पात्रप्रोक्षण

ॐ भूर्भुवः स्वः । ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् ॥ १ ॥

ॐ प्रजापते न त्वदेतान्यन्यो, विश्वा जातानि परि ता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु, वयं स्याम पतयो रयीणाम् ॥ २ ॥

---

पानें वाढून झाल्यावर पहिल्या तीन मंत्रांना पात्र प्रोक्षण करावें चवथ्या मंत्रानें हातात पाणी घेऊन संकल्प सोडावा पाचवा आणि सहावा मंत्र भोजनापूर्वी करावयाच्या प्रार्थनेच्या स्वरूपाचे आहेत

संकल्पाचा मंत्र केवळ ब्राह्मण अथवा सुवासिनीभोजनाचे वळी म्हणावयाचा आहे

---

१ पात्रप्रोक्षण

१ सर्व स्थिर आणि चर जगाला उत्पन्न करणाऱ्या तेजस्वी सूर्याचें तेज जें आमच्या बुद्धीला प्रेरणा देत, त्याचें आम्ही ध्यान करतों.

२ हे लोकपाल, उत्पन्न झालेल्या या जगाला तुझ्यावाचून दुसरा कोणी निर्माता नाहीं ज्या इच्छेनें तुझी आम्ही पूजा करतो, त्या आमच्या इच्छा तू पूर्ण कर अनेक प्रकारच्या संपत्तीचे धनी तू आम्हास कर

एको विष्णुर्महद्भूत पृथग्भूतान्यनेकशः ।
त्रीन् लोकान् व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ॥ ३ ॥

२. संकल्प

अनेन ब्राह्मणसुवासिनी भोजनेन श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ ४ ॥

३. प्रार्थना

पन्तु नद्यो वर्षन्तु पर्जन्याः । सुपिप्पला ओषधयो भवन्तु ॥
अन्नवतामोदनवतामामिक्षवताम् एषा ँ राजा भूयासम् ॥ ५ ॥

ओदनमुद्ब्रुवते । परमेष्ठी वा एषः । यदोदनः ।
परमामेवैन ँ श्रिय गमयति ॥ ६ ॥

॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥

---

३. भगवान् विष्णु हाच स्थिर व चर सृष्टीच्या अतीत असून त्यापासूनच वेगवेगळीं पञ्चमहाभूतं उत्पन्न झालीं आहेत. त्रैलोक्याला व्यापून असणारा हा विश्वभोगी परमेश्वर मी तयार केलेलें भोजन माझ्या द्वारे भक्षण करो.

२. संकल्प

४. या ब्राह्मण–सुवासिनीभोजनाच्या योगे परमेश्वर प्रसन्न होवो.

३. प्रार्थना

५–६. नद्या जलपूर्ण अशा वाहोत. योग्य वेळीं भरपूर पाऊस पडो, औषधी फलपुष्पयुक्त होवोत. विविध प्रकारचीं धान्यें, ओदन आणि दहीं दूध यांचा मी धनी व्हावें. वेद ओदनाविषयी म्हणतात कीं ओदन म्हणजे भात हा सर्व प्राण्यांना सामर्थ्य देणारा परमेष्ठी आहे. हा सुप्रसिद्ध भात उत्कृष्ट सामर्थ्य व संपत्ति हे सर्व प्राप्त करून देतो. म्हणून सर्वांनी भोजन हें अत्यंत महत्त्वाचें कार्य समजलें पाहिजे.

卐 卐 卐

## पंचायतनाची मांडणी

पंचायतनाची मांडणी देवपूजेच्या वेळी कशी करण्यात यावी यासंबंधी अनेक प्रकार आपल्या समाजात रूढ आहेत. कोणत्या देवतेला मुख्य स्थान द्यावयाचे यानुसार हे प्रकार पडलेले आहेत. यांपैकी विशेष रूढ प्रकार खाली दिले आहेत —

| | | |
|---|---|---|
| २ शंकर | | ३ गणेश |
| | १ विष्णू | |
| ५ देवी | | ४ सूर्य |

| | | |
|---|---|---|
| २ विष्णू | | ३ शंकर |
| | १ गणेश | |
| ५ देवी | | ४ सूर्य |

| | | |
|---|---|---|
| २ शंकर | | ३ गणेश |
| | १ सूर्य | |
| ५ देवी | | ४ विष्णू |

| | | |
|---|---|---|
| २ विष्णू | | ३ शंकर |
| | १ देवी | |
| ५ सूर्य | | ४ गणेश |

| | | |
|---|---|---|
| २ विष्णू | | ३ सूर्य |
| | १ शंकर | |
| ५ देवी | | ४ गणेश |

## देव किती असावेत व कसे असावेत.

दोन महादेव ( लिङ्ग ), तीन गणपति, तीन देवी, मत्स्य, कूर्म वगैरे दहा अवतार, दोन शंख, दोन शाळिग्राम, दोन द्वारकेची चक्र, दोन सूर्य, यांची उपासना एका घरात करू नये सामान्यत एका देवाच्या अनेक मूर्ती घरात असू नयेत फुटक्या, तुटक्या, जळक्या, अपवित्र स्थळी ठेवलेल्या देवतांची अपवित्र स्थळी पूजा करू नये श्रद्धा वाढविणाऱ्या देवतांची मनाला प्रसन्नता देणाऱ्या ठिकाणी पूजा करावी. चार अंगुळापेक्षा जास्त मोठी अशी दगडी

मूर्ति व धातूंची वितीपेक्षा मोठी मूर्ति घरात पुजू नये वरील सर्व विचार घरातील देवतासंबंधींच आहेत

## विशिष्ट उपासना

ज्या शक्तीची आपल्यात विशेष उणीव तिच्या प्राप्तीकरितां वेगवेगळ्या देवतांच्या उपासना करावयाच्या असतात. उदाहरणार्थ, आरोग्याकरिता मारुती, बुद्धीकरिता गणपती, ऐश्वर्याकरिता विष्णु, ज्ञानाकरिता शिव, तेजाकरिता सूर्य, आणि शत्रुनाशाकरिता व सामर्थ्याकरिता देवी यांची उपासना करितात

पूजेच्या प्रकारासंबंधीं विविध माहिती खाली दिली आहे मनाला समाधान होण्यास पूजा हें उत्कृष्ट साधन आहे असा अनेकांचा अनुभव आहे. त्याचा अनुभव साधकांनीं जरूर पहावा. चित्रकारांनींहि सोज्वळ साहित्यानें किंवा मानसिक ध्यानानें कसे समाधान प्राप्त होतें याचा अनुभव घ्यावा मन प्रसन्न राहून उत्साह वाढण्यास हा एक उत्कृष्ट उपाय आहे. परमेश्वराशीं समरस होऊन त्याचे सामर्थ्य मिळविण्याचा हा मार्ग आहे. म्हणून नीटनेटकेपणा, शांतता यांची या कृत्यास फार जरूर आहे शांत जागा, सुंदर फुलें, पुष्पें सुगंधी धूप, दीप, या सर्व गोष्टींची सामग्री एकत्र झाल्यावर वेड्यालाही आनंद होईल मग विश्वव्यापी परमेश्वराच्या अनंतत्वाची जिज्ञासा असलेल्यास अधिक उत्साह वाटेल हें सांगणें नलगे

लोकांना बडेजाव दाखविणाऱ्या दांभिकाला मात्र हें सर्व कष्ट देणार होईल यांत शंका नाहीं. विचाराला योग्य अशा प्रकारची मन स्थिति व्हावी, सर्व इंद्रियांची उत्साहशक्ति वृद्धिंगत व्हावी आणि परमेश्वराकडे लक्ष वेधावें, अशा उद्देशानें पूजाविधि प्रचारात आला आहे. त्याचा उपयोग करणाऱ्याच्या मन स्थितीवर पूजेचा एकंदर परिणाम अवलंबून आहे. साधकांनीं याचा विचार करावा.

### पूजेचीं उपकरणें

पूजेला लागणाऱ्या उपकरणांत खालील गोष्टींचा समावेश होतो --ताम्हन, पाटें, पळी, देव कोरडे करण्यास व पुसण्यास वस्त्र, देवाचें आसन,

धूपपात्र (धागटी वगैरे), दीपपात्र (नीराजन इ.), नैवेद्यपात्र, पंचारतिपात्र, पंचामृतपात्र, हळदकुंकवाचा करंडा, स्नानपात्र व अघ्यपात्र.

हीं सर्व पात्रें सुवर्ण, चांदी, तांबें, कासें, या धातूंची आणि सर्वांहिपक्षा श्रेष्ठ म्हणून ताम्याची असावींत पंचामृतपात्र मात्र तांब्याचें नसावें. देवाची उपकरण इतरत्र वापरू नयेत.

卐 卐

## सोळा उपचार

### पूर्वांग आणि उत्तरांग

पुढील सोळा उपचार आवाहनापासून सुरू होतात व नमस्कारानें समाप्त होतात या उपचाराआधीं केले जाणारे सारे विधि पूजेचे 'पूर्वांग' आणि नंतरचे सारे विधि पूजेचे 'उत्तरांग' या नावानें ओळखले जातात.

### उपचाराची नामावलि

देवताना समर्पण करण्याचे उपचार १०८-६४-१८-१६-१०-५ अशा प्रमाण सहा प्रकारचे आहेत त्यांपैकी १०८ व ६४ हे उपचार देवीच्या तांत्रिक पूजेतच फक्त असतात. आश्वलायनाच्या परिशिष्टात सांगितलेले १६ उपचार सध पूजा व महापूजेत स्वीकारतात ते पुढील प्रमाणें —

१. आवाहन, २. आसन, ३ पाद्य, ४ अर्घ्य, ५. आचमनीय, ६ स्नान, ७. वस्त्र ८. यज्ञोपवीत, ९ गंध, १० पुष्प-पत्र, ११. धूप, १२. दीप, १३. नैवेद्य, आचमनीय, १४. फल-तांबूल-दक्षिणा, १५. प्रदक्षिणा (आर्तिक्य) १६ (मंत्रपुष्प) नमस्कार (प्रार्थना, शरणागति)

## २. आसन

देवतेचें आवाहन केल्यानंतर आसन देणें हा दुसरा उपचार आहे. पूजेला बसताना आपलें आसन देवतेच्या आसनापेक्षा उच्च नसावें.

## ३. पाद्य

आसन दिल्यानंतर पाद्य देतात. पाद्य म्हणजे पाय धूण्यासाठीं दिलेलें पाणी. तें शंखानें किंवा स्वतंत्र भांड्यानें देतात. मूर्तीवर कोणताही उपचार करताना पायाऐवजीं सर्व मूर्तीवरच करितात. पाद्योपचार पायावर केल्यास योग्यच.

## ४. अर्घ्य

अर्घ्य म्हणजे पूजा. देवतेचें आवाहन करुन आसन द्यावयाचें, नंतर पाय धुण्यास पाणी देऊन, पाय धुतल्यानंतर स्वागत सत्कार करावयाचा. त्याकरिता अर्घ्य दिलें जातें. अर्घ्यपात्र स्वतंत्र असल्यास बरें. अर्घ्य म्हणजे पाणी, अक्षता, गंध, फुलें हीं घालून जल समर्पण करणें. यांत दुर्वा, तुळशी, हळद, कुंकू, व कांहीं धान्यें हींहि देवतेला अनुसरुन घालण्याची चाल आहे. सध्यें आपण केवळ पाण्याचाच अर्घ्य देतो. शिव व सूर्य याखेरीज देवतांना शंखानें अर्घ्य देणें चांगलें.

## ५. आचमनीय

आचमनीय म्हणजे पिण्याकरिता किंवा चूळ भरण्याकरिता पाणी देणें. हें देवतांच्या मुखस्थानीं द्यावें. शुद्धोदक देणें हा उत्तम पक्ष सुगंधी उदकहि देतात.

## ६. स्नान

दूध, दहीं, तूप, मध आणि साखर यांनीं क्रमानें देवतेला स्नान घालणें यास पंचामृतस्नान म्हणतात. प्रत्येकाचा जो मंत्र आहे तो म्हणून वरील पदार्थ देवाला समर्पण करावा, आणि शुद्धोदक, गंध, फूल वाहावें. शक्य तर प्रत्येक वेळीं धूप दीपहि द्यावा. पंचामृतस्नान नि अभ्यंगस्नान नित्य न घालता सणावाराला किंवा महापूजा असेल तेव्हा घालतात. जर पंचामृतातील पांचहि पदार्थ न मिळतील तर फक्त दुग्धस्नान घालावें.

नंतर सुगंधी द्रव्यें म्हणजे चंदन किंवा तेल, उटणें वगैरे देवाला समर्पण करावीत. तेल वगैरे लावून उष्णोदकानें देवाला स्नान घालावें.

घरातील देवाना रोज स्नान घालावें, तथापि यंत्रे व विशेष मोठ्या आकाराच्या मूर्ति याना रोज स्नान घालूं नये. पर्वकाळीं म्हणजे एकादशी वगैरे दिवशीं घालावें. शिव, गणपति, मारुति, याना हा नियम लागूं नाहीं. स्नान नेहमी शुद्धोदकानें घालावें. तथापि उन्हाळ्यात वाळा, थंडींत केशर वगैरे सुगंधी द्रव्यें पाण्यांत घालतात. चंदन, वाळा, केशर हे पदार्थ पाण्यांत घालून देवाला समर्पण करावयाचें पाणी सुगंधी करण्याची चाल आहे.

## ६. अभिषेक

अभिषेक म्हणजे देवावर सतत धार धरून त्या त्या देवतांना प्रिय असणारे मंत्र किंवा सूक्तं म्हणणें. शंकराला अभिषेकास वनगाईचें शिंग, विष्णूला शंख, गणपति व सूर्य याना तांब्याचें भांडें व देवीला सोन्याचें भांडें विशेष चांगलें. तांब्याचें भांडें हे सर्वत्र चागले. इतरत्र दुधाला तांब्याचें भांडें निषिद्ध आहे, पण दुधाच्या अभिषेकास तांब्याचें भांडें निषिद्ध नाहीं. अभिषेकाच्या वेळीं वाद्यें वाजत असावीत, निदान घंटा वाजवावी. निदान अभिषेकाच्या समाप्तीच्या वेळीं घंटा वाजवावी, धूप जाळावा, उदबत्त्या लावाव्यात.

सर्व देवाना पुरुषसूक्ताचा अभिषेक करावा. तथापि प्रत्येक देवाकरितां वेगवेगळीं सूक्तें आहेत. विष्णूला पवमान सूक्त, शिवाला रुद्रसूक्त, गणपतीला गणेशाथर्वशीर्ष, देवीला श्रीसूक्त, व सूर्याला सौर. याशिवाय महिम्न व मराठीहि अनेक सूक्तं म्हणून देवताना अभिषेक करण्याची चाल आहे.

## ७. वस्त्र

देवाला वस्त्र समर्पण करावें. परंतु दररोज नवें वस्त्र घावयास नको. वस्त्र, सुवर्णादि धातूचे अलंकार हे निर्माल्य होत नाहींत. केवळ जलप्रोक्षण केल्यानें देवांचें वस्त्र शुद्ध होतें. तें दररोज धुण्याची जरुरी नाहीं. निळीनें रंगविलेलें वस्त्र देवाला समर्पण करूं नये. विष्णूला पिवळें, शंकराला पांढरें, देवी, सूर्य आणि गणपति याना तांबडें वस्त्र अर्पण करावें. मळकें, फाटकें, व तेलकट वस्त्र कधींहि

वाहूं नये. वस्त्र वीतभर असावें. त्यापेक्षां लहान असूं नये. केवळ निळा रंग असूं नये. मिश्र रंगांत निळा असला तरी चालेल. परंतु मिश्र रंगाचें वस्त्र फक्त देवीलाच समर्पण करावयाचें असतें. तसेंच रेशमी व लोकरीच्या वस्त्राचा निळा रंग निषिद्ध नाहीं. मळलेल्या, घाण येणाऱ्या फाटक्या वस्त्रापेक्षां वस्त्र नसलें तरी हरकत नाहीं.

## ८. यज्ञोपवीत

देवतांना रोज नवें जानवें देऊं नये. यज्ञोपवीत पुरुष देवतानाच द्यावें. तें सोन्याचें, रेशमाचें, किंवा सुताचें विधियुक्त केलेले तीन पदरी ग्रंथीसहित असावें.

## ९. गंध

'गंधाष्टक' हे विशेषतः देवताना वाहण्याची चाल आहे. सर्वसाधारण लोक केवळ चंदनच वाहतात. १. चंदन, २. केशर, ३. वाळा, ४. कापूर, ५. धूप, ६. न्हीवेर, ७. कोष्ट, ८. जटामासी हीं द्रव्यें एकत्र उगाळून जें तयार होतें त्यास 'गंधाष्टक' म्हणतात. सर्व देवांना लागू असे गंध म्हणजे सुगंधी द्रव्य, चंदन, धूप, कृष्णागारू धूप व केशर हे क्रमानें एकापेक्षां एक श्रेष्ठ आहेत. विष्णूला तुळशीकाष्ठाचे गंध विशेष प्रिय आहे. तुळशीच्या पानाला गंध लावून तें विष्णूला वाहिलं असता तें त्याला अत्यत प्रिय आहे. गध शिंपत ठेवावें. हातावर किंवा तांब्याच्या पात्रांत कधींहि ठेवूं नये. देवाला पातळ गंध न वाहता त्याच्या गोळ्या करून वहाव्यात.

## १०. पुष्प-पत्र

केवडा विष्णूला वाहूं नये. कोणत्याहि फुलाच्या कळ्या देवाला वाहूं नयेत. चाफा आणि कमळें ही पूर्ण प्रफुल्लित झाल्यानतर त्यांचा सुवास नष्ट होतो, म्हणून तीं फुलें मात्र प्रफुल्लित होण्याच्या वेताला वाहावीत. सुकलेलीं, आपोआप गळून पडलेलीं, वास घेतलेली, कीड लागलेलीं, अंगाला लावलेली, चोरून आणलेलीं, दुसऱ्याच्या मालकीचीं, दुसऱ्याच्या घरांतील कळ्या तोडून मुद्दाम उमलविलेलीं, पाण्यांत धुतलेली, जमिनीवर पडलेलीं अशी फुलें देवाला कधींहि वाहूं नयेत. त्यापासून फार दोष लागतो.

विशेषत दुसऱ्याच्या घरून चोरून, लपवून, नासुधी असताना, झाड ओरबाडून आणलेली पत्री, फळे, ही फार दोषावह आहेत. त्यापासून कोणत्याहि कृत्याचे उलट फळ मिळते. तांबडी लाल, अकाली उत्पन्न झालेली, स्मशान किंवा अपवित्र जागी उत्पन्न झालेली, डाव्या हाताने आणलेली, रुईच्या किंवा एरंडाच्या पानावर आणलेली फुले ते हादि देवाला वाहू नयेत. विष्णूला रुई, मदार, धोतरा, गोकर्ण, कोरांट, कुडा, शिरीष, कन्हेर ही फुले वाहू नयेत. शाळिग्रामाला अक्षता वाहू नयेत.

शिवाला प्रिय असणारी फुले—

रुई, कन्हेर, बिल्वपत्र, द्रोणपुष्प, आघाडा, दर्भपुष्प, शमिपत्र, कमळ, बकुळ, धोतरा, तसेंच सुगंधी पांढऱ्या रंगाचीं पुष्प शिवाला विशेष प्रिय आहेत. निळें कमळ शंकराला अत्यंत प्रिय आहे.

शिवाला अप्रिय असणारी पुष्पपत्रे--

शिवाला खालील वस्तू वाहू नयेत -पळसाची फुले, दुर्वा, मालती, बाण (करवाल), तुळस, भृंगराज, तमाल, जुई, दुपारी, तिळसी, तांबडी जास्वंद, कुडा, तांबडी कन्हेर, केवडा, बकुळ, व दवणा.

अन्य देवतांना प्रिय आणि अप्रिय असणारी फुले

आघाडा, तांबडी फुलं, सुगंधी पांढरी फुले देखील विशेष प्रिय आहेत.
दवणा, तगर, धोतरा, मदार, शिवाप्रा, व तांबडी फुलें सूर्याला विशेषत आवडतात. रक्तचंदन सूर्याला प्रिय आहे.

गणपतीला गणेशचतुर्थीशिवाय अन्य दिवशीं तुळस निषिद्ध आहे. तांबडी फुले, मदार, जास्वंद, तांबडी कमळें, दुर्वा व शमी ही गणपतीला विशेष आवडतात. शेंदूर व रक्तचंदन गणपतीला प्रिय आहे.

वर साधारण माहिती दिली आहे. त्या त्या दिक्प्रांत उत्पन्न होणारी सुगंधी व सुंदर फुलें ही सर्वच देवांना प्रिय आहेत.

फुलें कशीं वहावीत

फूल व फळ जसें उत्पन्न होतें तसें देवाकडे देंठ करून वाहावें. वेलाचें पान पालथें व दुर्वा शेंडे आपल्याकडे करून वाहाव्यात.

ताजा वेल न मिळाल्यास शिळा वाहिला तरी चालतो. वेलाच्या ऐवजीं तुळस, निर्गुंडी, जंबू, आवळी यांचीं पानेंही शिवाला वाहिलीं तरी चालतात.

ताजा वेल न मिळाल्यास वेलाचीं शिळीं, त्रिदळं नसलेली पानें वाहिली तरी चालतात. अर्थात् हें नियमाकरितां आहे.

पळसाचें फूल एक दिवस, कमळ तीन दिवस, वेलाचें पान पांच दिवस, आणि तुळशीचें पान दहा दिवस शिळें म्हणजे त्याज्य होत नाहीं.

## ११. धूप

हा नाक व डोळे यांना सुखकर आणि मनाला प्रसन्नता देणारा असावा. चंदन, गुग्गुळ, कस्तुरी, कापूर, राळ, जटामांसी वगैरे सुगंधी पदार्थांचा असावा.

## १२. दीप

नीरांजनात फुलवात किंवा वात लावून तें देवाच्या तोंडापासून पायापर्यंत ओवाळावें. वात पांढऱ्या स्वच्छ कापसाची असावी. ती तेलांत भिजवूं नये. शक्यतोंपर्यंत तुपांत भिजवावी. निरांजनासारख्या पात्रात दीप लावून तो ओवाळून झाल्यावर समईसारख्या उंच पात्रावर ठेवण्याची व्यवस्था असावी. देवाच्या तोंडावर उजेड पडेल अशा ठिकाणीं दीप ठेवावा. देवावर अंधार पडेल अशा खालपट ठिकाणीं दीप ठेवूं नये.

दीप लावतांना दीपानें दीप लावूं नये. काडीनें दीप लावावा. दिव्यानें दीप लावल्यानें आणि विझल्यावर अर्धवट जळकट वातीची घाण सुटल्यानें रोग व दारिद्र्य प्राप्त होतें. जमिनीवर वात केव्हांहि लावूं नये. नीरांजनांतून वात काढून ठेवूं नये. अनेक वाती लावणें असल्यास विषम प्रमाणांत म्हणजे १-३-५-७ अशा लावाव्यात. दीप लावतांना त्यात वातीशिवाय थोडे तेल किंवा तूप घालावें.

## १३ नैवेद्य

ज्या देवाला जे पदार्थ प्रिय असतात, त्या देवाला ते पदार्थ प्रामुख्यानं समर्पण करावेत. उदाहरणार्थ, विष्णूला नाना तऱ्हेची वरण-भात, दूध-दहीं, याची पक्वान्नं, गणपतीला मोदक, लाडू सूर्याला परमान्न म्हणजे खीर व देवीला पुरण अर्थात् हें विशेष दिवसाकरिता आहे. नेहमीकरिता नाहीं रोज आपण जें खाऊ त्याचा नैवेद्य दाखवावा. शेवटीं आपल्याजवळ जें असेल त्याचा पाण्यानें मानसिक नैवेद्य दाखवावा देवताना आवडणारा पदार्थ जरी प्रामुख्यानें असला तरी बाकी सर्व भक्ष्य, भोज्य, लेह्य, पेय, आणि चोष्य पदार्थांचा त्यात समावेश असावा.

कोणताहि पदार्थ देवतेला समर्पण केल्याशिवाय खाऊ नये चौकोनी मंडल करून त्यावर नैवेद्य ठेवून बोटानी ग्रास घालत्यामप्रमाणें देवाला नैवेद्य समर्पण करावा मध्यें व शेवटीं पाणी घावें व फुल समर्पण करावेंन

## १४ फल, तांबूल, दक्षिणा

पान दोन, चार, किंवा त्याहीपेक्षा जास्त घऊन सुपारी, कात, चुना आणि शक्य तर कापूर, वल्दोडे, लवंग, केशर, जायपत्री, खोबर हेंही पदार्थ घालावेत, व त्याचा विडा समर्पण करावा

पुष्कळ ठिकाणीं असा विडा न देता दोन चार किंवा त्यापेक्षाहि अधिक पानं घऊन त्यावर संपथ सुपारी ठेवून विडा देण्याची चाल आहे रोजच्या पूजेस याची जरूरी नाहीं यथाशक्ति दक्षिणा ब्राह्मणाला किंवा धर्मरक्षक कार्याला द्यावी.

## १५-१६ प्रदक्षिणा व नमस्कार

नंतर देवाला प्रदक्षिणा घालून नमस्कार करावा प्रदक्षिणेस जागा नसेल तर स्वतः च्या भोंवतीं फिरून प्रदक्षिणा आणि साष्टांग नमस्कार घालावा.

卐 卐

# उत्तरांग कृत्यें

## प्रार्थना व शरणागति ( आरती )

कापूर लावून किंवा अनेक वाती लावून वाजंत्र्या किंवा घंटानादाच्या गजरात देवाची आरती करावी. देवाच्या डोक्यापासून पायापर्यंत आरती ओवाळावी. आराध्य देवतेची आरती म्हणावी. भक्तिभावाने टाळीवर आरत्या म्हणाव्यात. घरातील सर्व लहान थोरांना आरती करण्याकरता बोलवावें व सर्वांनीं मिळून आरती म्हणावी.

## पुष्पांजली व प्रसाद

आरती झाल्यावर सर्वांना मंत्रपुष्प म्हणून राष्ट्रीय प्रार्थना म्हणून देवाला पुष्पांजली वाहावीत. नंतर प्रसाद वाटावा.

## निर्माल्य

देवाचा निर्माल्य यत्नपूर्वक पवित्र स्थळीं टाकावा. तो पायदळीं किंवा कुठल्या अशा जागीं टाकू नये.

卐 卐

# पूजेचे आवश्यक नियम

## काहीं निषिद्ध गोष्टी

पाय पसरून, झुकत, निजून, बडबडत, मोठ्याने बोलत, आदळआपट करीत, आरडत ओरडत, रडत, लगबगेडा करीत, मुलांबाळांना टाकून बोलत, स्त्रियांचा अनादर करीत, बीभत्स भाषण करीत, सामर्थ्य असता दरिद्रीपणाने, निष्काळजी पणाने, रागपीत, त्या त्या कालाला अनुसरून उत्पन्न होणारें फळ अर्पण न करता, वेतन घेऊन, आत्मस्तुति करीत किंवा अन्य देवाची निंदा करीत, कोणत्याही देवतेचें पूजन करू नये. जेवणापूर्वी पवित्रपणानें स्नान करून धूत

वस्त्र नेसून प्रसन्न मनानें पूजन करावें नायकांना व मुलांना पूजा करण्यास सागू नये. पंचायतनापक्षा अनेक देव जमा करू नयेत.

## देवाघराची व्यवस्था

व्यवस्था जेथल्या तेथे टापटीपीची व प्रसन्नता येणारी असावी. स्वयपाकघरात, शौचकूपाशेजारी, अधारात, गडबडीच्या ठिकाणीं देवाची जागा नसावी. मोकळे, उजेडाचें आणि निरुंद असे देवघर असावें. जमिनीवर सारवून किंवा फरशी करून स्वस्तिकयुक्त रागोळी काढलेली असावी. बसण्यास लाकडी पाट, आसने असावीत. उपकरणीं चादीचीं किंवा ताम्याचीं असावींत.

## पूजेचे प्रकार

प्रतिमा पुढें ठेवून वरील पद्धतीप्रमाणें पूजा करण्याचा सर्वत्र परिपाठ दिसतो. माणसाहीं देवतेचें पूजन खालील ठिकाणीं करण्याविषयीं शास्त्रात सांगितल आहे —

१. पाण्यात, २. अग्नीत, ३ सूर्याचे ठिकाणीं, ४. स्वत च्या हृदयात, ५. मातीच्या ढिगावर, किंवा ६. मूर्तीमध्य या प्रकारात कोणताही प्रकार कनिष्ठ नाही.

वरील प्रकारापैकी आपल्या अधिकाराप्रमाण पूजाप्रकाराची निवड करावी कर्ममार्गी लोकाना अग्नीत, सामान्यत सब तऱ्हेच्या लोकांना पाण्यात, योग्याना हृदयात, विचारा लोकानीं सूर्यात, भाविक लोकानीं मातीच्या ढिगावर आणि अनुकूलता असलेल्या लोकांनीं मूर्तीत परमेश्वराचें पूजन करावें स्वत च्या अधिकारा प्रमाणें असलेला पूजा-प्रकार त्या माणसाला श्रेष्ठ होय.

वरील भेदाला अनुसरुन पूजचे प्रकारहि वेगळे आहेत. अग्नीत हविर्द्रव्याना, पाण्यात फुलानीं, मनात ध्यानानें, सूर्यात जपानें, व प्रतिमेची मान सब प्रकारानीं पूजा करावी.

卐 卐

# पूजेचे मंत्र

## पुराणोक्त पूजा-मंत्र

सध्यां प्रचलित असणारा 'पूजाविधि' बहुशीं पुराणोक्त मंत्रानीं बनलेला आहे. सोळा उपचारांशीं संबंधित पुराणोक्त मंत्र उपलब्ध आहेत तेच आम्ही 'पूजा-विधि' मध्यें समाविष्ट केले आहेत.

## वेदोक्त पूजा-मंत्र (पुरुषसूक्त)

पूजेच्या प्रसंगीं पुराणोक्त मंत्राच्या जोडीनें वेदोक्त मंत्र म्हणण्याचीहि चाल आहे. देवपूजेतील सोळा उपचारांशीं संबंधित असणारे सोळा वेदोक्त मंत्र 'पुरुषसूक्त' या नावानें प्रसिद्ध आहेत. 'पुरुषसूक्ता' तील एक एक मंत्राचें पठन करून एक एक उपचार देवाला समर्पण करण्याची पद्धत अनेक ठिकाणीं रूढ आहे.

'पूजा-विधि' मध्यें सुगमता आणि सुसूत्रितपणा आणण्यासाठीं मुख्य 'पूजा-विधि' मध्यें सोळा उपचाराचे केवळ पुराणोक्त मंत्र आम्हीं दिले आहेत. 'पुरुषसूक्त' पूजा-विधीच्या अखेरास स्वतंत्र परिशिष्टांत देण्यात आलें आहे.

## महापूजा—

'महापूजा' करते समयींच केवळ म्हणावयाचे स्वतंत्र वैदिक व पुराणोक्त मंत्र उपलब्ध आहेत. दैनंदिन 'पूजा-विधि' मध्यें या मंत्राचे प्रयोजन नसल्यानें मुख्य 'पूजा-विधि' मध्य आम्ही ते समाविष्ट केलेले नाहीत. 'पूजा-विधि' च्या अखेरास स्वतंत्र परिशिष्टांत ते संकलित करण्यात आलें आहे.

असें करण्यानें दैनंदिन करावयाचा 'पूजा-विधि' सुसूत्रीत व सुगम वाटेल अशी श्रद्धा आहे.

## मानसपूजा

' पूजा-विधि ' करण्याचा अन्य एक प्रकार म्हणजे ' मानसपूजा ' होय. ' मानसपूजा ' हा उपासनेचा श्रेष्ठ मार्ग अनेक साधक मानतात. या ' मानस पूजेचे ' संस्कृत मन ' पूजा विधी 'च्या अखरीस परिशिष्ट ३ मध्ये देण्यात आले आहेत. संत तुकाराम महाराज कृत ' मानसपूजे ' चे अभंगहि तेथेच देण्यात आले आहेत.

हे मन्त्र कंठस्थ करून त्याचे नित्यनियमाने पठण केल्यास त्यायोगे मानसिक समाधान व शांति लाभते असा अनेक साधकांचा अनुभव आहे.

## आरत्या

' पूजा विधि ' ची समाप्ती गणपति, देवी अथवा विठ्ठलाची आरती म्हणून करण्याची पद्धत आपणाकडे रूढ आहे. या तीनही आरत्या ' पूजा विधी 'च्या अखरीस परिशिष्ट ४ मध्ये देण्यात आल्या आहेत

## नाम-मंत्र—

नाममंत्राने इष्ट देवतेची पूजा करण्याची पद्धति सर्वत्र रूढ आहे. ज्याची जी देवता असेल त्या देवतेचे या देवतासमूहाचे ( पंचायतन ) नाव घेऊन ' पूजा विधि ' करण्यात येते. विष्णूची ' श्री विष्णवे नमः ' अथवा ' विष्णु देवताभ्यः ' असे म्हणून, शंकराची ' ॐ नमः शिवाय ' अथवा ' महादेव देवताभ्यः ' असे म्हणून, गणपतीची ' ॐ गणेशाय नमः ' अथवा ' गणपति देवताभ्यः ' असे म्हणून, आणि देवीची 'देव्यै नमः ' अथवा 'महादेवी देवताभ्यः ' असे म्हणून गंधादि अर्पण करून पूजा करतात

卐 卐 卐

# पूजाविधिः

卐

## अनुक्रम

卐

### (१) पूर्वांग कृत्यें

## (२) सोळा उपचार

### (१२) षोडशोपचारपूजनम्

## (३) उत्तराग कृत्यें

### (१३) मंत्रपुष्प

卐 卐

परिशिष्ट क्र. १

### महापूजाविधिः

परिशिष्ट क्र. २

### पुरुषसूक्तम्

परिशिष्ट क्र. ३

### मानसपूजा

परिशिष्ट क्र. ४

### आरत्या

卐 卐 卐

# पूजाविधि ।



## १ पूर्वांगकृत्यें

### ( १ ) देवता-नमस्कारः

( आचम्य प्राणानायम्य )

श्रीमन्महागणाधिपतये नम । इष्ट देवताभ्यो नम । ग्रामदेवताभ्यो नम । वास्तुदेवताभ्यो नम । सर्वेभ्यो देवेभ्यो नम । सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमो नम । एतत्कर्मप्रधानदेवताभ्यो नम । आदित्यादिनवग्रहदेवताभ्यो नमो नम ।

---

### ( १ ) देवता-नमस्कार

श्रीमहागणपतीला नमस्कार, इष्टदेवतेला नमस्कार कुलदेवतेला नमस्कार. ग्रामदेवतेला नमस्कार. गृहदेवतेला नमस्कार. सव देवताना नमस्कार सव ब्राह्मणाना नमस्कार. चालू कार्यातील मुख्य देवतेस नमस्कार सूर्यादि नवग्रह देवताना नमस्कार.

सुमुखश्चैकदन्तश्च कपिलो गजकर्णक: ।
लम्बोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिप: ॥ १ ॥

धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजानन: ।
द्वादशैतानि नामानि य: पठेच्छृणुयादपि ॥ २ ॥

विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ।
संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥ ३ ॥

शुक्लाम्बरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजम् ।
प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशान्तये ॥ ४ ॥

सर्वमंगलमांगल्ये शिवे सर्वार्थसाधिके ।
शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोऽस्तु ते ॥ ५ ॥

सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषाममंगलम् ।
येषां हृदिस्थो भगवान्मंगलायतनं हरि: ॥ ६ ॥

---

१–३ सुमुख, एकदन्त, कपिल, गजकर्णक, लम्बोदर, विकट, विघ्ननाश, गणाधिप, धूम्रकेतु, गणाध्यक्ष, भालचंद्र, गजानन ही बारा नावें विद्याशिक्षणाच्या आरंभी, विवाहात, प्रवेशाच्या वेळीं, बाहेर पडताना, युद्धप्रसंगीं, संकटाचे वेळीं जो म्हणेल किंवा ऐकेल त्यास विघ्न उत्पन्न होत नाहीं

४. पांढरे वस्त्र धारण करणारा, तेजस्वी, चंद्राच्या कांतीचा, चार हातांनीं युक्त, प्रसन्नमुख अशा परमेश्वराला सर्व विघ्नांच्या शांतीकरिता मनात आणावें

५. सर्व मंगलांना मंगलप्रदता देणारी, शुभ, सर्वकार्य सिद्ध करणारी, संरक्षण करणारी, तीन डोळे असलेली, गौरवर्णयुक्त आणि परमेश्वराच्या आश्रयानें असणारी अशा देवीस नमस्कार

६. ज्याच्या मनांत सर्व मंगलस्थान परमेश्वर असतो त्यांना नेहमीं कोणत्याहि कार्यांत अमंगलाचें नावसुद्धां काढावयास नको.

तदेव लग्न सुदिन तदेव ताराबल चन्द्रबल तदेव ।
विद्याबल दैवबल तदेव लक्ष्मीपत तेंऽघ्रियुग स्मरामि ।  ॥ ७ ॥

लाभस्तेषा जयस्तेषा कुतस्तेषा पराजय ।
येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दन ।  ॥ ८ ॥

विनायक गुरु भानु ब्रह्मविष्णुमहेश्वरान् ।
सरस्वतीं प्रणौम्यादौ सर्वकार्यार्थसिद्धय ।  ॥ ९ ॥

अभीप्सितार्थसिद्ध्यर्थं पूजितो य सुरासुरै ।
सर्वविघ्नहरस्तस्मै गणाधिपतये नम ।  ॥ १० ॥

सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वरा ।
देवा दिशतु न सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दना ।  ॥ ११ ॥

卐 卐

---

७ परमेश्वराचें पादकमल आठविणे हीच शुभ वेळा, चागला दिवस, ग्रहबल, आणि चंद्रबल होय.

८ ज्याच्या अतःकरणात कृष्ण भगवान् आहे त्याना लाभ व जय प्राप्त होतो त्याचा पराजय कुठला ?

९ विनायक, गुरु सूर्य, ब्रह्मा, विष्णु महादेव, सरस्वती व गणपति याना प्रथम नमस्कार असो

१० मनातील इच्छा पूर्ण होण्याकरता सुर व असुर हे ज्याची पूजा करतात त्या विघ्नहर्त्या गणपतीला माझा नमस्कार असो

११ सर्व कार्यात त्रैलोक्याचे जे ईश्वर ब्रह्म, महेश व विष्णु हे आम्हाला सिद्धि देवोत

卐 卐

## (२) देशकालोच्चारणम्

श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य, अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे, विष्णुपदे, श्रीश्वेतवाराहकल्पे, वैवस्वतमन्वन्तरे, कलियुगे, प्रथमचरणे, अष्टाविंशतितमे युगे,

भरतवर्षे, भरतखंडे, जंबूद्वीपे, शालिवाहन शके, बौद्धावतारे,

अस्मिन् वर्तमाने, अमुकनामसंवत्सरे, अमुकअयने, अमुकऋतौ, अमुकमासे, अमुकपक्षे, अमुकतिथौ, अमुकवासरे, अमुकदिवसनक्षत्रे, अमुकस्थिते वर्तमाने चंद्रे, अमुकस्थिते श्रीसूर्ये, अमुकस्थिते श्रीदेवगुरौ, शेषेषु ग्रहेषु यथायथं राशिस्थानस्थितेषु सत्सु,

एवंगुणविशेषणविशिष्टायां शुभपुण्यतिथौ—

## ( ३ ) सकल्प

मम आत्मन श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थम् अस्माक सकुटुम्बाना सपरिवाराणा द्विपदचतुष्पदसहिताना क्षेमस्थैर्यायुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थं, समस्ताभ्युदयार्थं च परमेश्वरप्रीत्यर्थ, महाविष्णु प्रमुखपचायतनदेवताप्रीत्यर्थं, यथामालितोपचारद्रव्यै , ध्यानावाहनादि-षोडशोपचारपूजा पुरुषसूक्तेन पुराणोक्तमत्रेण वा करिष्ये।

तदड्गत्वेनासनादिनिमित्तकलशशखघटापूजन च करिष्ये।

卐 卐

## ( ४ ) गणपति-पूजनम्

आदौ निर्विघ्नतासिध्यर्थं महागणपति स्मरण च करिष्ये।

---

## ( ३ ) सकल्प

मला वेद, स्मृति, पुराणं यामध्यें सांगितलेलें फल प्राप्त होण्याकरता, आमच्या कुटुबासहित सर्व परिवारास, मनुष्य पशु आदिकरून सर्वांस शांति, स्थैर्य, आयुष्य, आरोग्य, ऐश्वर्य याच्या अभिवृद्धीकरिता सर्व एहिक उन्नत्या करिता आणि परमेश्वरप्रीत्यर्थ विष्णु, शकर, गणेश, सूर्य देवी यांची यथा प्राप्त पदार्थांनी ध्यान आवाहनादि सोळा उपचारांनीं पुरुषसूक्तानें वा पुराणोक्त मत्रानीं पूजा करतों

तसेच पूजेच्या अगभूत असणारे आसनादि विधि, तसेच कलश, शख, घटा इत्यादि पूजेच्या साधनांचें पूजन करितों

卐 卐

## ( ४ ) गणपति-पूजन

पूजा निर्विघ्नपणें पार पडावी एतदर्थ मी प्रथमत गणपतीचें स्मरण करतो

वक्रतुंड महाकाय, सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा
श्रीमन्महागणपतये नमो नमः । ॥ १२ ॥

## ( ५ ) आसनविधिः

पृथ्वीति मन्त्रस्य मेरुपृष्ठऋषिः । कूर्मो देवता ।
सुतलं छंदः । आसने विनियोगः ।
ॐ पृथ्वि त्वया धृता लोका, देवि त्वं विष्णुना धृता ।
त्वंच धारय मा देवि, पवित्रं कुरु चासनम् ॥ १३ ॥
अपसर्पन्तु ते भूताः, ये भूता भूमिसंस्थिताः ।
ये भूता विघ्नकर्तारः, ते नश्यन्तु शिवाज्ञया ॥ १४ ॥

---

१२. हे सोंड वळवलेल्या, विशाल शरीराच्या व तेजःपुंज गणनायका, माझ्या कार्यांतील विघ्नें दूर कर.
गणपतीला नमस्कार करावा.

## ( ५ ) आसनविधिः

'पृथ्वी' या मंत्राचा मेरुपृष्ठ हा ऋषि, कूर्म ही देवता आणि सुतल हा छंद होय. आसनाकरिता उपयोग.

१३. हे पृथ्वी, तूं सर्व लोकांना धारण करितेस व विष्णूनें तुला धारण केली आहे. तू मला धारण कर आणि माझें आसन पवित्र कर.

१४. जी भूतें माझ्या सभोंवती संचार करितात, जी भूतें माझ्या आसनभूमीवर स्थिर आहेत आणि जी भूतें मला विघ्न करतील ती सर्व शिवाच्या आज्ञेनें दूर जावोत.

अपक्रामन्तु भूतानि, पिशाचा सर्वतो दिशम् ।
सर्वेषामविरोधेन, पूजाकर्म समारभे ॥ १५ ॥

卐 卐

## ( ६ ) कलश–पूजनम्

कलशस्य मुखे विष्णु , कण्ठे रुद्र समाश्रित ।
मूले तत्र स्थितो ब्रह्मा, मध्ये मातृगणा स्मृता ॥ १६ ॥
कुक्षौ तु सागरा सर्वे, सप्तद्वीपा वसुन्धरा ।
ऋग्वेदोऽथ यजुर्वेद , सामवेदो ह्यथर्वण ।
अङ्गैश्च सहिता सर्वे, कलश तु समाश्रिता ॥ १७ ॥
अत्र गायत्री सावित्री, शांतिपुष्टिकरी तथा ।
आयान्तु देवपूजार्थं, दुरितक्षयकारका ॥ १८ ॥

---

१५. भूतें, पिशाच्चें वगैरे उपद्रव करणारे सर्व दूर दिशेस जावोत सर्वांच्या अविरोधानें मी पूजेस सुरुवात करतों

卐 卐

## ( ६ ) कलशपूजन

१६ कलशाच्या मुखाच्या ठिकाणी विष्णु, कंठाचे ठिकाणीं रुद्र व मुळाचे ठिकाणी ब्रह्म आणि मध्यभागाचे ठिकाणी ब्राह्मी, वैष्णवी इत्यादि मातृदेवता प्राप्त होवोत.

१७ सर्व समुद्र, सप्तद्वीपांनी युक्त असणारी पृथ्वी, षडंगासहित असणारे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे सर्व कलशामध्ये प्राप्त होवोत

१८ आरोग्य, मनाला शांति आणि शरीराला आरोग्य देणारी गायत्री आणि सावित्री माझ्या देवपूजेकरितां सर्व पापांचा नाश करणाऱ्या होवोत

गंगे च यमुने चैव, गोदावरि सरस्वति ।
नर्मदे, सिंधु, कावेरि, जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ॥ १९ ॥
श्रीवरुणाय नमः । गंधाक्षतपुष्पाणि समर्पयामि ।

卐 卐

## (७) शंखपूजनम्

शंख चन्द्रार्क-दैवत्य, वरुण चाधिदैवतम् ।
पृष्ठे प्रजापतिं विद्यात्, अग्रे गंगा सरस्वती ॥ २० ॥
पांचजन्याय विद्महे, पावमानाय धीमहि ।
त नः शंख. प्रचोदयात् ॥ २१ ॥
शंखाय नमः । गंधपुष्पं समर्पयामि ।

卐 卐

---

१९. गंगा, यमुना, गोदावरी, सरस्वती, सिंधु, कावेरी ह्या नद्या माझ्या पूजेच्या उदकात प्राप्त होवोत. पश्चात नमस्कार.
या उपचारांकरिता गंधाक्षतपुष्प समर्पण करतो.

卐 卐

## ( ८ ) घंटा–पूजनम्

आगमार्थं तु देवानां गमनार्थं च रक्षसाम् ।
कुरु घंटारवं तत्र, देवताह्वानलक्षणम् ॥ २२ ॥

घंटायै नमः । गंधाक्षत पुष्पं समर्पयामि ।

卐 卐

## ( ९ ) दीप–पूजनम्

भो दीप ब्रह्मरूपः, त्वं ज्योतिषां प्रभुरव्ययः ।
आरोग्यं देहि पुत्रांश्च, सर्वार्थांश्च प्रयच्छ मे ॥ २३ ॥

दीपाय नमः । गंधपुष्पं समर्पयामि ।

卐 卐

---

## ( ८ ) घंटापूजन

२२. हे घंटे, देवाच्या आगमनाकरितां व राक्षसाना दूर करण्याकरितां तूं नाद कर.

घंटा–देवतेला नमस्कार करून गंधाक्षतपुष्प वाहावें.

卐 卐

## ( ९ ) दीपपूजन

२३. हे दीपदेवते, तूं ब्रह्मरूप आहेस. तूं सर्वापेक्षा तेजस्वी आहेस आणि कधींहि क्षीण होणारी नाहींस. मला आरोग्य आणि पुत्र देऊन माझ्या सर्व इच्छा पूर्ण कर.

दीपदेवतेला नमस्कार करून गंधपुष्प वाहावें.

卐 卐

## ( १० ) शुद्धिकरणम्

अपवित्रः पवित्रो वा, सर्वावस्थां गतोऽपि वा ।
यः स्मरेत् पुण्डरीकाक्षं, स बाह्याभ्यंतरः शुचिः॥ २४ ॥
पूजाद्रव्याणि सम्प्रोक्ष्य, आत्मानं प्रोक्षयेत् ।

卐 卐

## (११) ध्यानम्

१. विष्णुध्यानम्

शान्ताकारं भुजगशयनं, पद्मनाभं सुरेशम् ।
विश्वाधारं गगनसदृशं, मेघवर्णं शुभाङ्गम् ॥ २५ ॥
लक्ष्मीकान्तं कमलनयनं, योगिभिर्ध्यानगम्यम् ।
वन्दे विष्णुं भवभयहरं, सर्वलोकैकनाथम् ॥ २६ ॥

---

## ( १० ) शुद्धिकरण

२४. अपवित्र किंवा पवित्र असा जो कोणी विष्णूचें स्मरण करील तो सर्व तन्हेने शुद्ध होतो.

पंचपात्रीतील पाण्यानें पूजाद्रव्यें आणि स्वतःचे शरीर यांचें प्रोक्षण करावें

卐 卐

केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी,
हारी हिरण्मयवपु र्धृतशंखचक्र ॥ ३० ॥

५. देवीध्यानम्

नमो देव्यै महादेव्यै, शिवायै सततं नमः ।
नमः प्रकृत्यै भद्रायै, नियताः प्रणताः स्म ताम् ॥ ३१ ॥

卐 卐

## २. सोळा उपचार

## ( १२ ) षोडशोपचारपूजनम्

१. आवाहनम्

आगच्छ देव देवेश, तेजोराशे जगत्पते ।
क्रियमाणां मया पूजां, गृहाण सुरसत्तम ॥ ३२ ॥
आवाहनार्थे पुष्पांजलिं समर्पयामि ।

---

हार, शंख, चक्र हें धारण केलेला, अत्यंत तेजस्वी असणाऱ्या सूर्याचें ध्यान करावें.

५. देवीचें ध्यान

३१. सर्व जगाचें कल्याण करणाऱ्या, जगाचे आदिकरण असणाऱ्या आणि सर्व प्रकारची सुखसंपत्ति देणाऱ्या अशा देवीला आमचा नेहमीं नमस्कार असो

卐 卐

## ( १२ ) षोडशोपचारपूजन

१. आवाहन

३२ हे देवश्रेष्ठा, तेजोमय जगाच्या अधिपते, मी करीत असलेली पूजा आपण स्वीकारा

आवाहनाकरितां पुष्पांजलि अर्पण करावी.

२. आसनम्

नानारत्नसमायुक्त, कार्तस्वर-विभूषितम् ।
आसन देवदेवेश, प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् ॥ ३३ ॥
आसन समर्पयामि ।

३. पादोदकम्

पाद्य गृहाण देवेश, सर्वक्षेमकर प्रभो ।
भक्त्या समर्पित देव, लोकनाथ नमोऽस्तु ते ॥ ३४ ॥
पाद्य समर्पयामि ।

४. अर्घ्यम्

नमस्ते देवदेवेश, नमस्ते धरणीधर ।
नमस्ते जगदाधार, अर्घ्यं न प्रतिगृह्यताम् ॥ ३५ ॥
अर्घ्यं समर्पयामि ।

---

२. आसन

३३. हे देवाधिदेवा, रत्नजडित सिंहासन सुखाने बसण्याकरिता घ्या.
आसन अर्पण करावे.

३. पादोदक

३४. सर्व जगाला सुख देणाऱ्या हे ईश्वरा, पाय धुण्याकरिता पाणी भक्तीने समर्पण करत आहे. ते आपण स्वीकारावें हे लोकनाथा, आपणास नमस्कार असो.
पाद्य अर्पण करावे

४. अर्घ्य

३५. हे देवाधिदेवा, मी आपणास नमस्कार करतो. हे जगाच्या आधारा, तुम्ही आमच्या अर्घ्य स्वीकारा.
अर्घ्य अर्पण करावे.

५ आचमनम्

कर्पूरवासितं तोयं, मन्दाकिन्या समाहृतम् ।
आचम्यतां जगन्नाथ, मया दत्तं हि भक्तितः ॥ ३६ ॥
आचमनीयं समर्पयामि ।

६ स्नानम्

गंगासरस्वती रेवा, पयोष्णी नर्मदाजलैः ।
स्नापितोऽसि मया देव, तथा शान्तिं कुरुष्व मे ॥ ३७ ॥
स्नानीयं समर्पयामि ।

७. वस्त्रम्

सर्व भूषाधिके सौम्ये, लोकलज्जानिवारणे ।
मयोपपादिते तुभ्यं, वाससी प्रतिगृह्यताम् ॥ ३८ ॥
वस्त्रं समर्पयामि ।

---

५ आचमन

३६ हे [illegible] कापराचा वास लावलेलें पाणी, हे जगन्नाथा, मी भक्तिपूर्वक आपणास चूळ भरण्यास समर्पण करीत आहे
चूळ भरण्यासाठी पाणी अर्पण करावे

६ स्नान

३७ गंगा, सरस्वती, रेवा (नर्मदा), पयोष्णी यांच्या पाण्यानें तुला मी स्नान घातलें आहे. तू शांति दे
स्नानासाठी पाणी अर्पण करावें.

७ वस्त्र

३८ सर्व भूषणांमध्ये श्रेष्ठ, लज्जानिवारक असें मी तयार केलेलें [illegible] [illegible] स्वीकारावें
वस्त्र अर्पण करावें

८ यज्ञोपवीतम्

देवदेव नमस्तेऽस्तु, त्राहि मां भवसागरात् ।
ब्रह्मसूत्रं सोत्तरीयं गृहाण पुरुषोत्तम ॥ ३९ ॥
यज्ञोपवीतं समर्पयामि ।

९. गंध

श्रीखण्ड चन्दनं दिव्यं गन्धाढ्यं सुमनोहरम् ।
विलेपनं सुरश्रेष्ठ चन्दनं प्रतिगृह्यताम् ॥ ४० ॥
चन्दनं समर्पयामि ।

१०. अक्षता व पुष्पे

अक्षतास्तण्डुला शुभ्रा कुंकुमेन विराजिता ।
मया निवेदिता भक्त्या गृहाण परमेश्वर ॥ ४१ ॥
अक्षता समर्पयामि ।

---

८. यज्ञोपवीत

३९ देवाधिदेव आपणास माझा नमस्कार असो. भवसागरापासून माझे संरक्षण करा हे पुरुषोत्तमा, उत्तरीयासहित यज्ञोपवीत आपण ग्रहण करा.
यज्ञोपवीत अर्पण करावे

९ गंध

४० हे सुरश्रेष्ठ, चंदनाचे, सुगंधी, दिव्य, उत्तम प्रकारचा सुवास असलेले अत्यंत आल्हाददायक चंदन आपण विलेपनाकरिता स्वीकारा
गंध अर्पण करावे

१० अक्षता व पुष्पे

४१ पांढऱ्या शुभ्र आणि कुंकू लावून सुशोभित केलेल्या अक्षता मी भक्तिपूर्वक देतो हे परमेश्वरा ग्रहण करा
अक्षता अर्पण कराव्यात

माल्यादीनि सुगंधीनि मालत्यादीनि वै प्रभो ।
मयाहृतानि पूजार्थं पुष्पाणि प्रतिगृह्यताम् ॥ ४२ ॥
पुष्पाणि समर्पयामि ।

११ धूप

धूपं समर्पयामि ।

१२ दीप

दीपं समर्पयामि ।

१३ नैवेद्य

नैवेद्यं समर्पयामि ।

प्राणाय स्वाहा । अपानाय स्वाहा । व्यानाय स्वाहा । उदानाय स्वाहा । समानाय स्वाहा । ब्रह्मणे स्वाहा । मध्ये पानीयं समर्पयामि । उत्तरापोशनं समर्पयामि । हस्तप्रक्षालनं करोद्वर्तनार्थे चंदनं च समर्पयामि ।

---

४२ हे प्रभो मालती आदि अतिशय सुवासिक फुले मी आपल्या पूजेकरिता आणली आहेत त्यांचा स्वीकार करा
पुष्पे वाहावीत

११ धूप

धूप अर्पण करावा ( लावावा )

१२ दीप

दीप अर्पण करावा ( लावून ओवाळावा )

१३ नैवेद्य

'प्राणाय स्वाहा' वगैरेंनी नैवेद्य समर्पण करून मध्ये पळीभर पाणी देऊन नंतर पुन 'प्राण' वगैरेंने नैवेद्य समर्पण करावा

## १४. फलतांबूल–दक्षिणा

इदं फलं मया देव, स्थापितं पुरतस्तव ।
तेन मे सुफलावाप्तिर्भवेत् जन्मनि जन्मनि ॥ ४३ ॥
फलं समर्पयामि ।

पूगीफलं महद्दिव्यं, नागवल्लयादलैर्युतम् ।
कर्पूरैलासमायुक्तं, ताम्बूलं प्रगृह्यताम् ॥ ४४ ॥
ताम्बूलं समर्पयामि ।

हिरण्यगर्भ गर्भस्थं, हेमबीजं विभावसोः ।
अनन्तपुण्यफलदम्, अतः शान्ति प्रयच्छ मे ॥ ४५ ॥
फलं समर्पयामि ।

---

## १४. फलतांबूल–दक्षिणा

४३. परमेश्वरा, हे फल मी तुमच्यापुढें ठेविलें आहे त्यामुळें प्रत्येक जन्मीं चांगलीं फळें भोगवण्याचें भाग्य मला लाभो.

देवाला फळ अर्पण करावें.

४४. नागवी सुपारी विड्याच्या पानांत घालून त्यात कापुर, वेलदोडा घातला आहे असा हा तयार केलेला विडा आपण ग्रहण करावा.

देवाला विडा द्यावा.

४५. जगाच्या पोटांत असणारें अग्नीचें बीज आणि जे दिल्यानें अनंत पुण्य त्यामतें असे सुवर्ण मी देतों. यामुळें मला शान्ति प्राप्त होऊं दे.

देवाला दक्षिणा अर्पण करावी.

१५. प्रदक्षिणा

यानि कानि च पापानि, जन्मान्तरकृतानि च ।
तानि तानि विनश्यन्ति, प्रदक्षिणपदे पदे ॥ ४६ ॥
प्रदक्षिणा समर्पयामि ।

१६. नमस्कार

नमः सर्वहितार्थाय, जगदाधारहेतवे ।
साष्टांगोऽयं प्रणामस्ते, प्रयत्नेन मया कृतः ॥ ४७ ॥

卐 卐

## ३. उत्तराग कृत्ये

## ( १३ ). मंत्रपुष्प–राष्ट्रीय प्रार्थना

१. मंत्रपुष्प

ॐ राजाधिराजाय प्रसह्यसाहिने, नमो वयं वैश्रवणाय कुर्महे ।
स मे कामान् कामकामाय, मह्यं कामेश्वरो वैश्रवणो ददातु ॥

---

१५. प्रदक्षिणा

४६. प्रदक्षिणेच्या पावलागणिक ह्या जन्मीची किंवा अन्य जन्माची जी काही पापें असतील ती सर्व नष्ट होवोत.
प्रदक्षिणा घालावी.

१६ नमस्कार

४७. सर्वांचे हित करणारा आणि जगाला आधारभूत अशा परमेश्वराला माझा साष्टांग नमस्कार असो.
साष्टांग नमस्कार करावा.

卐 卐

## ( १३ ) मंत्रपुष्प–राष्ट्रीय प्रार्थना

१. मंत्रपुष्प

आम्ही सर्व शक्तिमान व सर्व व्यापक परमेश्वराची नमनपूर्वक प्रार्थना

कुबेराय वैश्रवणाय महाराजाय नमः ।

२. राष्ट्रीय प्रार्थना

ॐ स्वस्ति साम्राज्य भौज्यं, स्वाराज्य वैराज्य पारमेष्ठ्य राज्यं माहाराज्यमाधिपत्यमयं समन्तपर्यायी स्यात् सार्वभौम सार्वायुष आंतादा परार्धात् ।

पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराळिति ।
तदप्येष श्लोकोऽभिगीत ।
मरुत परिवेष्टारो, मरुत्तस्यावसन् गृहे ।
आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवा सभासद इति ॥

卐 卐 卐

---

करतो की, हे परमेश्वरा, तू भक्ताचे हृदय जाणणारा आहेस तर आम्हीं मनामध्यें धरलेली इच्छा सफल होवो व आमचें कल्याण होवो

२ राष्ट्रीय प्रार्थना

आमच्याकडे साम्राज्य पसरून त्यामध्यें सर्व उपभोगाचे पदार्थ उत्पन्न होवोत त्या साम्राज्यामध्ये प्रजातंत्रानें चालणारी राज्य पद्धति असो तेथे सर्व जगतापेक्षा सर्व बाजूनीं उत्तम व्यवस्था असो सर्व लोक परमात्मनिष्ठ होऊन मुक्तिसुखाचे अधिकारी बनाने आम्हाला त्या साम्राज्यात विशेष अधिकार असोत

आमच्या साम्राज्यात पुष्कळ अधिकारी असोत व हें सर्व मिळून होणारें राज्य चारहि बाजूंना समुद्रापर्यंत व्यापणाऱ्या पृथ्वीवर पसरलेलें असो.

आमचा जो असा साम्राज्याचा सार्वभौम राजा होईल तो दीर्घायु होऊन हें आमचें साम्राज्य या सृष्टीच्या अंतापर्यंत परार्धकालाच्या समाप्तीपर्यंत एकसारखें नांदत राहो ( ऐ. ब्रा ८ १५, २१ )

卐 卐 卐

परिशिष्ट... १

# महापूजाविधि

卐

## ( १ ) पंचामृतस्नानम्

( १ ) पय स्नान—

ॐ आ प्यायस्व समेतु ते, विश्वतः सोम वृष्ण्यम् ।
भवा वाजस्य संगथे ॥ १ ॥

कामधेनो समुद्भूत, देवर्षिपितृतृप्तिदम् ।
पयो ददामि देवेश, स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥ २ ॥
पय स्नानं समर्पयामि ।

---

'आ प्यायस्व' आदि मंत्र म्हणून देवताना दुधाचें स्नान घालून शुद्ध उदकाचें स्नान घालावें आणि सर्व पूजेकरिता गंध आणि अक्षता वाहाव्यात. असें प्रत्येक पदार्थानें स्नान घातल्यावर पूजन करावें.

---

(२) दधिस्नान

ॐ दधिक्राव्णो अकारिषं
जिष्णोरश्वस्य वाजिनः ।
सुरभि नो मुखा करत्,
प्र ण आयूंषि तारिषत् ॥ ३ ॥

चन्द्रमण्डलसंकाश, सर्वदेवप्रिय दधि ।
स्नानार्थं ते मया दत्त, प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् ॥ ४ ॥
दधिस्नान समर्पयामि ।

(३) घृतस्नान

ॐ घृतं मिमिक्षे घृतमस्य योनि-
र्घृते श्रितो घृतम्वस्य धाम ।
अनुष्वधमा वह मादयस्व,
स्वाहाकृतं वृषभ वक्षि हव्यम् ॥ ५ ॥

---

२. दधिस्नान

३. जयशील व्यापक आणि आवेशयुक्त अशा दधिप्रिय देवाची मी स्तुति करतो. तो दव आमचं मुख, नेत्र वगैरे इंद्रियं तेजस्वी करो. आणि आम्हाला दीर्घायुष्य देवो (ऋ ४.३९६).

४. चन्द्रासारखें स्वच्छ व सर्व देवाना आवडणारें दहीं तुम्ही स्नानाकरितां अर्पण करीत आहे. आपण तें प्रसन्नतेकरिता ग्रहण करावें.

३ घृतस्नान

५. मी अग्नीमध्यें तुपाच्या आहुती देतो कारण तो अग्नि तुपातच उत्पन्न होतो, तुपातच राहतो, आणि तुपानेंच प्रज्वलित होतो

आज्यं सुराणां माहारम्, आज्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।
आज्यं पवित्रं परमं, स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥ ६ ॥

(४) मधुस्नान —

ॐ मधु॒ वाता॑ ऋताय॒ते, मधु॑ क्षरन्ति॒ सिन्ध॑वः ।
माध्वी॑र्नः स॒न्त्वोष॑धीः ॥ ७ ॥
मधु॒ नक्त॑मु॒तोष॒सो, मधु॑म॒त् पार्थि॑वं॒ रजः॑ ।
मधु॒ द्यौर॑स्तु नः पि॒ता ॥ ८ ॥
मधु॑मान्नो॒ वन॒स्पति॒र्मधु॑माँ अस्तु॒ सूर्यः॑ ।
माध्वी॒र्गावो॑ भवन्तु नः ॥ ९ ॥

सर्वौषधि समुत्पन्नं, पीयूषसदृशं मधु ।
स्नानार्थं ते प्रयच्छामि, गृहाण परमेश्वर ॥ १० ॥
मधुस्नानं समर्पयामि ।

---

हे अग्ने तुला स्वाहा म्हणून दिलेले हविर्द्रव्य देवाकडे नेऊन देवाना प्रवर कर मी दिलेले तूप तू देवाकडे पोचीव (ऋ २ ३.११)

६. तूप हा देवाचा आहार आहे आणि तूप हेच यज्ञातील मुख्य आहे. असे परम पवित्र असणार तूप हे ईश्वरा, तू स्नानाकरिता स्वीकारावेस

४ मधुस्नान

७ माणसाला वायु चांगले आरोग्य देवो, नद्या त्याना चांगले आरोग्यकारक जल देतात, त्याचप्रमाणे औषधि आम्हाला माधुर्ययुक्त रस देवात

८-९ रात्र, सकाळ, पृथ्वीवरचे लोक, पाऊस पाडून आम्हास रक्षिणारे आकाश वनस्पति, सूर्य, आणि गायी आम्हाला त्यांच्याजवळ असणारे आरोग्यदायक मधुर रस देवोत

१० सर्व औषधींपासून उत्पन्न झालेला अमृतासारखा मध आपल्याला स्नानाकरता मी समर्पण करतो हे परमेश्वरा आपण त्याला स्वीकार करावा.

(५) शर्करास्नान—

ॐ स्वादुः पवस्व, दिव्याय जन्मने ।
स्वादुरिन्द्राय सुहवीतुनाम्ने ।
स्वादुर्मित्राय वरुणाय वायवे ।
बृहस्पतये मधुमाँ अदाभ्यः ॥ ११ ॥

इक्षुदण्ड समुद्भूतदिव्यशर्करया हरिम् ।
स्नापयामि सदा भक्त्या, प्रीतो भव सुरेश्वर ॥ १२ ॥
शर्करास्नान समर्पयामि ।

(६) गंधयुक्त जलस्नान—

कर्पूरैलासमायुक्त, सुगंधिद्रव्यसमुतम् ।
गंगोदक मया दत्त स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥ १३ ॥
गंगोदकस्नान समर्पयामि ।

---

५ शर्करास्नान

११. हे शर्करे, गोड असणारा तू देवाना स्पर्श कर. थोर इंद्र, मित्र, वरुण, वायु, बृहस्पति याना स्पर्श कर, आणि तुझी गोडी कधींहि नष्ट न होवो (ऋ ९.८०.७)

१२. उसापासून निघालेल्या उत्कृष्ट साखरेनें ईश्वराला मी भक्तिपूर्वक स्नान घालतो हे सुरेश्वरा, आपण प्रसन्न व्हा.

६ गंधयुक्त जलस्नान

१३ कापूर, वेलदोडे, यांनीं युक्त, सुगंधी द्रव्य घातलेलें असे सुगंधी जल मी आपणांस स्नानाकरिता समर्पण करतो.

(७) शुद्धोदकस्नान—

शुद्धोदकस्नान समर्पयामि । महाभिषेकस्नान समर्पयामि ।

卐 卐

## (२) महापूजा मंत्राः

हरिद्रा स्वर्णवर्णाभा, सर्वसौभाग्यदायिनी
सर्वालङ्कारमुख्या हि, देवि त्व प्रतिगृह्यताम् ॥ १४ ॥
हरिद्राचूर्णसयुक्त, कुकुम कामदायक ।
वस्त्रालङ्करण सर्व, देवि त्व प्रतिगृह्यताम् ॥ १५ ॥
कज्जल कामिक रम्य, कामिनीकामसभवम् ।
नेत्रयोर्भूषणार्थाय, कज्जल प्रतिगृह्यताम् ॥ १६ ॥
उदितारुणसकाश, जपाकुसुमसनिभम् ।
सीमतभूषणार्थाय, सिंदूर प्रतिगृह्यताम् ॥ १७ ॥

---

७ शुद्धोदकस्नान

शुद्ध पाण्यानें स्नान घालावें

卐 卐

## (२) महापूजा मंत्र

१४ ते २२. सव उपयोग देणारी सोन्यासारखी व सर्वालकारात मुख्य असणारा हळद, हे देवी, तू ग्रहण कर.

कामपूरक कुकु व वस्त्रालकार हळदीसहित हे देवी, तू ग्रहण कर.

स्त्रियांच्या इच्छेमुळे उत्पन्न झालेले इच्छापूरक काजळ डोळ्यास शोभा देण्याकरिता, हे देवी तू ग्रहण कर.

उगवत्या सूर्यासारखा किंवा जास्वदीच्या पुष्पासारखा सिंदूर, भागाला शोभा यावी म्हणून हे देवी, तू स्वीकारावास.

मांगल्यतंतुमणिभिर्मुक्ताफलविराजितम् ।
कंठस्य भूषणार्थाय कंठसूत्र प्रतिगृह्यताम् ॥ १८ ॥
काचस्य निर्मित दिव्य, कंकण च सुरेश्वरि ।
हस्तालंकरणार्थाय, कंकण प्रतिगृह्यताम् ॥ १९ ॥
अलंकारान् मया देवि, सुवर्णेन विनिर्मितान् ।
प्रीत्यर्थं तव देवेशि, भूषण प्रतिगृह्यताम् ॥ २० ॥
नानाभरणशोभाढ्य, नानारत्नोपशोभितम् ।
अर्पित च मया देवि, ताडपत्र प्रतिगृह्यताम् ॥ २१ ॥
ज्योत्स्नापते नमस्तुभ्य, नमस्ते विश्वरूपिणे ।
नाना सौगंधिद्रव्याणि, गृहाण परमेश्वर ॥ २२ ॥

卐 卐

## ( ३ ) प्रार्थना

देवताभ्य मंत्रपुष्प समर्पयामि ।
आवाहन न जानामि, न जानामि तवार्चन
पूजां चैव न जानामि, क्षमस्व परमेश्वर ॥ २३ ॥

---

हे देवी, सुवर्णाचे तयार केलेले अलकार तू मनाच्या प्रसन्नतेकरिता स्वीकार.
अनेक प्रकारची शोभा देणारें, अनेक रत्नांनीं युक्त असें हें ताडपत्र हे देवी, मी अर्पण केलेलं ग्रहण कर.
हे ईश्वरा, विश्वधार अशा तुला नमस्कार असो अनेक प्रकारचीं सुगंधी द्रव्यें तू स्वीकार.

卐 卐

## ( ३ ) प्रार्थना

२३. आवाहन कसं करावें व विसर्जन कसं करावें आणि पूजन कसें करावें हें मला समजत नाहीं. हे परमेश्वरा, मला क्षमा कर

मंत्रहीन क्रियाहीन, भक्तिहीन सुरेश्वर ।
यत्पूजित मया देव, परिपूर्णं तदस्तु मे ॥ २४ ॥

अपराधसहस्राणि, क्रियन्तेऽहर्निशं मया ।
दासोऽयमिति मां मत्वा, क्षमस्व परमेश्वर ॥ २५ ॥

गतं पापं गतं दुःखं, गतं दारिद्र्यमेव च ।
आगता सुखसंपत्तिः, पुण्याच्च तव दर्शनात् ॥ २६ ॥

रूपं देहि जयं देहि, यशो देहि द्विषो जहि ।
पुत्रान् देहि धनं देहि, सर्वकामांश्च देहि मे ॥ २७ ॥

त्वमेव माता च पिता त्वमेव, त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्वं मम देवदेव ॥ २८ ॥

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा, बुध्यात्मना वानुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै, नारायणायेति समर्पयामि ॥ २९ ॥

---

२४-२९. मंत्र, क्रिया आणि भक्ति याना रहितहि माझें पूजन तुझ्या कृपेनें पूर्ण व्हावें, सहस्रावधि अपराध माझ्या हातून रात्रदिवस होत आहेत. तथापि केवळ तुझा भक्त म्हणून मला क्षमा करावीस.

तुझा केवळ दर्शनाचें माहात्म्य इतकें आहे कीं, सर्व पाप नाहींशी होतात सर्व दुःख आणि दारिद्र्य नाहींसे होतें. पुण्य आणि संपत्ति प्राप्त होते. आम्हांला रूप, जय, यश दे आणि शत्रूचा नाश कर आणि पुत्र, धन वगैरे देऊन माझ्या सर्व इच्छा तू पूर्ण कर.

मला माता, पिता, बंधु, मित्र या सर्वांच्या ठिकाणी तूच आहेस. मला विद्या व धनदाता तूच आहेस, फार काय, हे देवा माझें सर्वस्व तूच आहेस.

शरीरानें, वाणीनें, मनानें, इंद्रियांनीं, बुद्धीनें किंवा सहजस्वभावामुळें माझ्या हातून जें कांहीं घडत आहे तें सर्व परमेश्वररूपी नारायणाला मी समर्पण करतो.

अच्युत केशव, रामनारायण, कृष्णदामोदर, वासुदेव हरिम् ।
श्रीधर माधव गोपिकावल्लभ, जानकीनायक रामचंद्र भजे ॥ ३० ॥

हरे राम हरे राम, राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ ३१ ॥

## ( ४ ) शरणागति

घालीन लोटांगण, वंदीन चरण । डोळ्यांनीं पाहीन, रूप तुझें ।
प्रेमें आलिंगिन, आनंदे पूजीन । भावें ओंवाळिन, म्हणे नामा ॥३२॥

卐 卐 卐

---

३०–३१. अच्युत, केशव, राम, नारायण, कृष्ण, दामोदर, वासुदेव, हरी, श्रीधर, माधव, गोपींना प्रिय असणारा, जानकीपति रामचंद्र इत्यादि रूपानीं नटलेल्या परमेश्वराचें मी भजन करितों.

卐 卐 卐

## परिशिष्ट २

# पुरुषसूक्त आणि विष्णुसूक्त

卐

## (१) पुरुषसूक्त

सहस्रशीर्षा पुरुषः, सहस्राक्षः सहस्रपात् ।
स भूमिं विश्वतो वृत्वा, ऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥ १ ॥
पुरुष एवेदं सर्वं, यद्भूतं यच्च भव्यम् ।
उतामृतत्वस्येशानो, यदन्नेनातिरोहति ॥ २ ॥

---

## (१) पुरुषसूक्त

(ऋषि – नारायण, देवता–पुरुष (परमेश्वर) छन्द – १–१५ अनुष्टुभ् १६ त्रिष्टुभ् )

१ अनंत मस्तके, अनंत डोळे आणि अनंत पाद यांनी युक्त असणारा हा परमेश्वर सर्व जगाला व्यापून जगाच्या पलीकडे उरला आहे

२ सध्याचे, भूतकाळी असलेले आणि भविष्यकाळी होणार जगत् हे सर्व हा परमेश्वरच आहे हा देवांचा देव आपले मूळचे स्वरूप सोडून ह्या [illegible] स्थितीला प्राप्त होतो, तो सकळ प्राण्यांच्या कल्याणाकरिताच होय [illegible] हे त्याचे स्वरूप आहे.

एतावानस्य महिमा, ऽतो ज्यायाँश्च पूरुषः ।
पादोऽस्य विश्वा भूतानि, त्रिपादस्यामृतं दिवि ॥ ३ ॥
त्रिपादूर्ध्व उदैत् पुरुषः, पादोऽस्येहाभवत् पुनः ।
ततो विष्वङ् व्यक्रामत्, साशनानशने अभि ॥ ४ ॥
तस्माद्विराळजायत, विराजो अधि पूरुषः ।
स जातो अत्यरिच्यत, पश्चाद्भूमिमथो पुरः ॥ ५ ॥
यत् पुरुषेण हविषा, देवा यज्ञमतन्वत ।
वसन्तो अस्यासीदाज्यं, ग्रीष्म इध्मः शरद्धविः ॥ ६ ॥

---

३. हें सर्व दृश्य जग ह्या परमेश्वराचा महिमा होय, एवढेच नव्हे तर त्यापेक्षाहि ह्या परमेश्वराचें माहात्म्य जास्त आहे. दृश्य जग केवळ ह्याच्या माहात्म्याचा एक भाग असून बाकीचे तीन भाग आपल्या दृष्टीच्या टप्प्याच्या पलीकडे आहेत.

४. तो त्रिकालात्मक परमेश्वर ह्या अज्ञानमय संसाराच्या पलीकडे आहे. त्याचा एक भाग केवळ उत्पत्ति आणि लय या तऱ्हेनें सारखा भ्रमण करीत असतो. तो भाग चेतन आणि अचेतन अशा उभय सृष्टीला व्यापून राहिलेला आहे.

५. त्या परमेश्वरापासून हें विराट् जग उत्पन्न झालें, आणि त्या ब्रह्मांडामध्यें जीव उत्पन्न झाला. नंतर त्या जीवांना वेगवेगळीं रूपें धारण केली. पृथ्वी निर्माण झाली आणि वेगवेगळे शरीराचे आकारहि निर्माण झाले.

६. नंतर देवानीं जीवरूपी हविर्द्रव्याचा यज्ञ केला, तेव्हां वसंत ऋतु हा त्या यज्ञात आज्य, ग्रीष्म हा इंधन आणि शरद् ऋतु हा हविर्द्रव्य अशी रचना करण्यात आली.

तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन्, पुरुषं जातमग्रतः।
तेन देवा अयजन्त, साध्या ऋषयश्च ये ॥ ७ ॥

तस्माद्यज्ञात् सर्वहुतः, संभृतं पृषदाज्यम्।
पशून् तॉश्चक्रे वायव्यां, नारण्यान् ग्राम्याश्च ये ॥ ८ ॥

तस्माद्यज्ञात् सर्वहुतः, ऋचः सामानि जज्ञिरे।
छन्दांसि जज्ञिरे तस्मा, यजुस्तस्मादजायत ॥ ९ ॥

तस्मादश्वा अजायन्त, ये के चोभयादतः।
गावो ह जज्ञिरे तस्मात्, तस्माज्जाता अजावयः ॥ १० ॥

यत् पुरुषं व्यदधुः, कतिधा व्यकल्पयन्।
मुखं किमस्य को बाहू, का ऊरू पादा उच्येते ॥ ११ ॥

---

७. ज्यामुळें यज्ञ झाला, त्या प्रथम झालेल्या जीवानीं यज्ञ केल्यामुळे सृष्टि उत्पन्न करण्यास समर्थ असे देव आणि सृष्टीचें संरक्षण करण्यास आवश्यक ज्ञान देणारे ऋषि उत्पन्न झाले

८. त्यानींहि सर्व हवन केल्यामुळें दहि, तूप वगैरे पोषणास आवश्यक पदार्थ उत्पन्न झाले आणि वायूवर पोसणारे अरण्यातील आणि गांवांतील प निर्माण झाले.

ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्, बाहू राजन्यं कृतः ।
ऊरू तदस्य यद्वैश्यः, पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ १२ ॥
चन्द्रमा मनसो जात, श्चक्षोः सूर्यो अजायत ।
मुखादिन्द्रश्चाग्निश्च, प्राणाद्वायुरजायत ॥ १३ ॥
नाभ्या आसीदन्तरिक्षं, शीर्ष्णो द्यौः समवर्तत ।
पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्, तथा लोकाँ अकल्पयन् ॥१४॥
सप्तास्यासन् परिधय, स्त्रिः सप्त समिधः कृताः ।
देवा यद्यज्ञं तन्वाना, अबध्नन् पुरुषं पशुम् ॥ १५ ॥
यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि
धर्माणि प्रथमान्यासन् ।

---

१२ ब्राह्मण हे त्याचे मुख, क्षत्रिय हे त्याचे बाहू, वैश्य हे त्याच्या मांड्या आणि शूद्र हे पायापासून उत्पन्न झाले.

१३. त्याच्या मनापासून चन्द्र झाला. डोळ्यापासून सूर्य झाला. तोंडापासून इंद्र व अग्नि आणि प्राणापासून वायू उत्पन्न झाला.

१४. त्याच्या नाभीपासून अन्तरिक्ष, मस्तकापासून स्वर्ग, पायापासून भूमि आणि कानापासून दिशा उत्पन्न झाल्या.

१५. पूर्वी वर्णन केलेल्या यज्ञाचे सात छंद हे परिधि, बारा महिने, पांच ऋतु, तीन लोक आणि सूर्य ह्या एकवीस समिधा करून देव यज्ञ करू लागले आणि विराट पुरुषालाच (म्हणजे जीव सृष्टीलाच यज्ञीय पशु कल्पिलें) पशु म्हणून बांधलें.

१६. देवांनी सर्वस्वाचा यज्ञ करून यज्ञांतच श्रेष्ठ पदवीला चढलेल्या जीवाचा सत्कार केला. आणि तींच कृत्यें ज्यांच्या वाढीला कारण झालीं ते

ते ह नाकं महिमानः सचन्त
यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥ १६ ॥

卐 卐

## ( २ ) विष्णुसूक्त

अतो देवा अवन्तु नो, यतो विष्णुर्विचक्रमे ।
पृथिव्याः सप्त धामभिः ॥ १ ॥
इदं विष्णुर्वि चक्रमे, त्रेधा नि दधे पदम् ।
समूह्ळमस्य पांसुरे ॥ २ ॥

---

स्वर्गाच्या उत्पत्तीला साधक असणारे देव ज्या ठिकाणीं असतात तें स्वर्गरूपी स्थान थोर लोक प्राप्त करतात.

卐 卐

## ( २ ) विष्णुसूक्त

( ऋषि– मेधातिथि, देवता– विष्णु, छंद– गायत्री )

१. जेथून विष्णूनें पृथ्वीचें आक्रमण केलें, तेथून येऊन विष्णु आमचें रक्षण करो.

२. विष्णूनें हें जग व्यापलें आहे. पृथ्वी, आकाश व स्वर्ग यांत हें भरलेलें आहे त्याच्या तेजांत सर्व मग्न झालें आहे.

त्रीणि पदा वि चक्रमे, विष्णुर्गोपा अदाभ्यः ।
अतो धर्माणि धारयन् ॥ ३ ॥
विष्णोः कर्माणि पश्यत, यतो व्रतानि पस्पशे ।
इन्द्रस्य युज्यः सखा ॥ ४ ॥
तद् विष्णोः परमं पदं, सदा पश्यन्ति सूरयः ।
दिवीव चक्षुराततम् ॥ ५ ॥
तद् विप्रासो विपन्यवो, जागृवांसः समिन्धते ।
विष्णोर्यत् परमं पदम् ॥ ६ ॥

卐 卐

---

३ अविनाशी आणि रक्षण करणाऱ्या अशा विष्णूनें तीन पावलांनी हें जगत आक्रमिलें आणि तेव्हापासून तो (जागतिक) धर्मांचा आधार झाला आहे.

४. हे मित्रांनो, विष्णु तुमचीं कृत्यें पहात असतो. म्हणून विष्णूची तुम्ही उपासना करा. पराक्रमी लोकांचा तो अगदीं जिवलग सखा आहे.

५. विष्णुचें ध्यान विद्वान लोक सतत करत असतात. आकाशात उघडलेला तो जणू डोळाच होय.

६. सर्वांला व्यापून असणाऱ्या भगवान् विष्णूची, सतत विचारशील असणारे ज्ञाते लोक अखंड उपासना करतात.

(ऋ १. २२. १८–२१)

卐 卐

परिशिष्ट ३

# मानसपूजा

卐

## (१) श्री शंकराचार्य विरचिता

पूर्णस्यावाहनं कुत्र, सर्वाधारस्य चासनम् ।
स्वच्छस्य पाद्यमर्घ्यं च, शुद्धस्याचमनं कुतः ॥ १ ॥
निर्मलस्य कुतः स्नानं, वस्त्रं विश्वोदरस्य च ।
निरालम्बस्योपवीतं, पुष्पं निर्वासनस्य च ॥ २ ॥
निर्लेपस्य कुतो गंधो, रम्यस्याभरणं कुतः ।
नित्यतृप्तस्य नैवेद्यं, ताम्बूलं च कुतो विभो ॥ ३ ॥

---

(श्रीमत् शंकराचार्य कृत 'मानसपूजे' चा कवि विनायक कृत अनुवाद)

चराचरीं तूं आवाहन ये काय तुझ्या कामीं ?,
सकलाधारा द्यावें तुजला काय आसना मी ? ।
निर्मल जो त्या केलें ठरती अर्घ्यपाद्य वाया,
कर वाहेना आचमन तुला शुद्धाला द्याया ॥ १ ॥
घालूं कैसें तुला निर्मला देवा ! स्नानातें ?
विश्वोदर तूं तुला नहाया पट कवण्या हातें ? ।
निरालंब तूं उपवीताचें महत्त्व तुज नाहीं,
नसे वासना फुलें सुवासिक निष्फल त्या ठायीं ॥ २ ॥
गंधाची थोरवी कोणती नसे लेप ज्याला,
स्वतां रम्य तूं फिकी तुजपुढें पडे रत्नमाला ।
सदा तृप्त तूं, नैवेद्याची काय तुला वाणें
विभो ! तुष्ट तुज कसें करावें म्यां तांबूलानें ? ॥ ३ ॥

प्रदक्षिणा ह्यनन्तस्य, ह्यद्वयस्य कुतो नतिः ।
वेदवाक्यैरवेद्यस्य, कुतः स्तोत्रं विधीयते ॥ ४ ॥
स्वयंप्रकाशमानस्य, कुतो नीराजनं विभो ।
अन्तर्बहिश्च पूर्णस्य, कथमुद्वासनं भवेत् ॥ ५ ॥

卐 卐

## ( २ ) संत तुकाराममहाराज विरचित

अनंतजन्मींचे पाप दूर व्हाया । कृष्ण देवराया पूजा तुझी ।
लक्ष्मीचा पति वैकुंठीचा राणा । तुझी पुजा कोणा सांगू गडे ।

---

नसे अनंता प्रदक्षिणेचें दल माझ्या ठायीं,
अभिन्न तू मी, मग वंदणाऱ्या लागावें पायीं ? ।
तुजला स्तविता हात टेकिले जथ वेदांना,
कशी टिकावी तेथ वाणी मग बापुडवाणी ? ॥ ४ ॥
स्वयंप्रकाशी काय त्यापुढें नीराजनज्योती ?,
विसर्जन तुला कोठ ? विश्वे नांदविसी पोटीं ॥ ५ ॥

卐 卐

करून सारे सजले देवा ! तुझ्या पूजनासी,
मग न लेकरा वाटे जाया निजजनकापाशीं ।
चुकले मुकले शब्द मुलाचे गोडच जनकातें
बालिश लीला बघून त्याच्या मनीं हर्ष दाटे ॥ ६ ॥
अज्ञान मी लेकरू तुजकडे जनकाचें नातें,
तव सेवेचा देवा ! ओढा असे मात्र मातें ।
येईल तैसी करतों सेवा गोड करुनि घ्यावी,
पुण्यपदाची जोड वत्सला ! विनायका द्यावी ॥ ७ ॥

卐 卐

द्रव्यहीन आम्ही तेजशक्तिहीन । मन्त्रतन्त्रज्ञान काही नाही ।
तुका म्हणे तरी पूजा इच्छी जीव । आता मी ह्यास्तव कल्पी सारे ॥ १ ॥
त्रैलोक्यजननी देवी विष्णुपत्नी । माझिया आसनी कृपा करी ।
जी भूतें पूजेला करिताती विघ्नें । त्याजला न देणे ठाव येथें ।
व्हावें मन स्थिर कल्पना नसावी । ऐसी त्वां करावी बुद्धि माझी ।
तुका म्हणे ऐसे म्यां तुज प्रार्थिलें । व्हावें त्वा पहिले साह्य माझे ॥ २ ॥

卐 卐

## १. नमस्कार

त्रैलोक्य व्यापूनी देवाच्या विभूती । तुज पशुपति अर्चीं सदा ।
ललाटी कंठासी शिरी सर्वांगी । स्वर्धूनीया भगी दुर्वासना ।
तुका म्हणे रुद्र वदितो हरीला । माझा तुला त्याला नमस्कार ॥ ३ ॥
मना आतां स्थिर होई क्षणभरी । दुष्कल्पना सारी सोडी बापा ।
ध्यान करी त्याचे, जो जगत्पालक । वैकुंठनायक मुक्तीदाता ।
सुंदर ते ध्यान उभे विटेवरी । कर कटावरी ठेवूनीया ।
गळा तुळसीहार कांसे पीतांबर । आवडे निरंतर हेंची ध्यान ।
मकरकुंडले तळपती श्रवणीं । कंठी कौस्तुभमणी विराजित ।
तुका म्हणे माझें हेंची सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीने ॥ ४ ॥

卐 卐

## २. आसन

राही रखुमाबाई तिमरी स यभामा । निकट मेघश्यामा नवलीक ।
जयविजय द्वारी घेऊनी यष्टिका । वडेजाव भीमां गर्जनाती ।
नवांड कोंदला जयजय शब्द झाला । पार्श्वस्थ वाहिला सुरभार ।
तुका म्हणे ऐसी मूर्ति येतां ध्यानी । जीव मन दोन्ही कुरंडीये ॥ ५ ॥

चौरंग मांडिला दो रत्नखचित । ज्यावरी उचित चंद्रसूर्य ।
देव बैसविया ऐसिया आसनी । जो का वरदानी त्रैलोक्याचा ।
प्रसन्न वदन मंदहास्य शोभे । दृष्टी भक्तलाभे शांत ज्याची ।
तुका म्हणे ऐसे आसन घातलें । तेणे माझे झालें समाधान ॥ ६ ॥

卐 卐

## ३. मधुपर्क

गंगा यमुना कृष्णा नर्मदा कावेरी । भागीरथी नीरे भरले कुंभ ।
ते तप्त जीवन सुगंध घालून । आणिलेसे जाण सन्निधानी ।
सुवर्ण कलशे ओतूनीया पाणी । घातिलेसे चरणी स्वामीचिया ।
तुका म्हणे केले पादप्रक्षालण । तेणे माझे झालें समाधान ॥ ७ ॥

दधिदुग्धघृत शर्कराहि मधु । निर्मित कामधू तये काळी ।
आणूनीया वाटी जी रत्नखचित । मधुपर्क त्यात सिद्ध केला ।
दीनानाथा केली प्रार्थना मी देवा । मधुपर्क घ्यावा म्हणोनीया ।
तुका म्हणे माझ्या दीनाच्या प्रार्थने । मधुपर्क त्यान स्वीकारीला ॥ ८ ॥

卐 卐

## ४. स्नान

स्नानासी प्रार्थना आणिले पंचामृत । पयदधि घृत शर्करामधु ।
पृथक्पृथक न्हाणियेले देवा । वारंवार नव्या वस्त्रांवरी ।
शुद्धोदक मग घालूनीया प्रेमे । केली मेघश्यामे काया शुद्ध ।
तुका म्हणे प्रभु सर्वांचा आधार । चालवितो हरी लाड माझा ॥ ९ ॥

मुक्तामणी पांच वैडूर्य नील । आणिले पुष्कळ पुष्कराज ।
नाना रत्ने तैशी सुवर्णासहित । आणिली मी तेथे अभिषेका ।

मस्तकापासून अंगुष्ठापर्यंत । अभिषिंची स्वस्थपणे देवा ।
तुका म्हणे प्रभु सर्वांचा अमर । घेतो उपचार माझे हस्ते ॥ १० ॥

卐 卐

## ५. वस्त्र

मृदु रेशमाचे कोमल जे वस्त्र । आणिलें पवित्र लाघवेगी ।
माझ्या स्वामियाचा मस्तक पुशिला । स्वहस्ते झाडिला केशभार ।
पुसवुनी अंग उद्वर्तिले सांग । उठविले श्रीरंग धरले हाती ।
तुका म्हणे जो का सर्वांचा आधार । चालवितो हरी लाड माझा ॥ ११ ॥

पिवळा पीतांबर दोरंगी नेटका । जरीकाठी देखा घनघनीत ।
रंईफुले चित्रविचित्र करवती । सुवर्णाच्या हाती दिधला देवा ।
नेसला प्रीतीने पतितपावन । निरीया घाऊन मागें पुढें ।
तुका म्हणे जो का सर्वांचा अमर । परि उपचार घेतो माझा ॥ १२ ॥

जरीची उत्तरी दिव्य शाल जोडी । अर्पिता पवाडी स्वीकारिले ।
रत्नाचा मुकुट वर मोरपिच्छ । घेवोनीया स्वच्छ शिरी ठेवी ।
सुवर्णाचे यज्ञोपवीत आणिले । देवा स्वीकारीली जगन्नाथे ।
तुका म्हणे ऐसी वस्त्रे सर्व दिली । तीही स्वीकारिली भक्तियोगे ॥ १३ ॥

## ६. गंध

卐 卐

रत्नसिंहासन वर प्रभावळ । त्यावरी सोज्वळ वस्त्र मृदु ।
पताका चामरे उभे सूर्येसनें । तैशा ती निंगुणें कीर्तिमुखे ।
लोटउशा मागे टेकाया नागूरा । त्यावरी बैसला स्वामी माझा ।
तुका म्हणे तेव्हा केले लिंबलोण । न लागो म्हणोन दृष्ट माझी ॥ १४ ॥

## (२) आरती विठ्ठलाची

जयदेव जयदेव जय पांडुरंगा ।
रखुमाई वल्लभा राहीच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ धृ० ॥
युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ।
वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥
पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा ।
चरणी वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥
तुळसीमाळा गळा कर ठेवुनि कटीं ।
कांसे पीतांबर कस्तुरि ललाटीं ॥
देव सुरवर नित्य येती भेटी ।
गरुड हनुमंत पुढें उभे राहती॥ २ ॥
धन्य वेणूनाद अणुक्षेत्रपाळा ।
सुवर्णाची कमळें वनमाळा गळां ॥
राईरखुमाबाई राणीया सकळा ।
ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥ ३ ॥
ओंवाळू आरत्या कुर्वंड्या येती ।
चंद्रभागेमाजीं सोडुनिया देती ॥
दिंड्या पताका वैष्णव नाचती ।
पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ ४ ॥
आषाढी कार्तिकी भक्तजन येती ।
चंद्रभागेमाजी स्नान जे करिती ॥
दर्शनहेळामात्रें तया होय मुक्ती ।
केशवासी (माधवासी) नामदेव भावें ओंवाळीती ॥ ५॥

## ( ३ ) आरती देवीची

जय देवी जयदेवी, जय महिषासुर मथिनी ।
सुरनरइश्वर वरदे, तारक संजीवनी ॥ धृ० ॥

दुर्गे दुर्घट भारी, तुजविण संसारी ।
अनाथनाथे अंबे, करुणा विस्तारी ।
वारी वारी जन्ममरणाते वारी ।
हारीं पडलों आता, संकट निवारी । ॥ १ ॥

त्रिभुवनीं भुवनीं पहाता, तुज ऐसी नाहीं ।
चारी श्रमले परन्तु, न बोलवे कांहीं ।
साहीं विवाद करिता, पडले प्रवाही ।
ते तूं भक्तालागीं, ते तूं दासालागीं, पावसीं लवलाही ।
॥ २ ॥

प्रसन्नवदने प्रसन्न, होसी निजदासां ।
क्लेशापासुनी काढी, दु:खापासुनि तोडी ।
तोडी भव पाशा ।
अंबे तुजवांचून, कोण पुरवील आशा ।
नरहरी तल्लीन झाला, पदपंकजलेशा ॥ ॥ ३ ॥

卐 卐

## (४) आरती शंकराची

जयदेव जयदेव, जय श्रीशंकरा ।
आरती ओवाळू, तुज कर्पुरगौरा ॥ ध्रु० ॥

लवथवती विक्राळा, ब्रह्मांडी माळा ।
विषें कंठ काळा, त्रिनेत्री ज्वाळा ।
लावण्य सुंदर, मस्तकी बाळा ।
तेथुनिया जळ निर्मळ, वाहे झुळझुळा ॥ १ ॥

कर्पुरगौरा भोळा, नयनी विशाळा ।
अर्धांगी पार्वती, सुमनाच्या माळा ।
विभुतीचे उटण सित कंठ नीळा ।
ऐसा शंकर शोभे, उमावेल्हाळा ॥ २ ॥

देवी-दैत्यी सागर-मथन पै केलें ।
त्यामाजी अवचीत हलाहल जे उठिलें ।
तें त्वा आनंदें प्राशन केलें ।
नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें ॥ ३ ॥

व्याघ्राम्बर फणिवरधर, सुंदर मदनारी ।
पंचानन मनमोहन, मुनिजन सुखकारी ।
शतकोटीचे बीज, वाचे उच्चारीं ।
रघुकुळ टिळक रामदासा अंतरीं ॥ ४ ॥

卐 卐 卐

जायमानो वै ब्राह्मण , त्रिभिर्ऋणवा जायते, ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो, यज्ञेन देवेभ्य , प्रजया पितृभ्य

एष वा अनृणो, य पुत्री, यज्वा, ब्रह्मचारिवासी ( तै. स. ६.३ १०-११)।

ज माला आलत्या प्र येकाय तीन ऋणें असतात --

१. ऋषिऋण ज्याची फड ऋषींच्याद्वारा निर्मित ग्रथाचा अभ्यास करून होते.

२. देवऋण, ज्याची फड यज्ञादिद्वारा त्याची पूजा करून होते.

३ पितृऋण, ज्याची फेड परात्रमी संतति निर्माण करण्याने होते.

अशा तऱ्हेने ज्ञानसंपादन, यज्ञ, पूजापाठ व सतति यांच्यायोग पूर्वजाची परपरा चालवून मनुष्य आपले पूर्वजांच्या ऋणाची फेड करीत असतो

## वैश्वदेवाविषयीं थोडें प्रास्ताविक

शुद्धयर्थं चात्मनोऽन्नस्य वैश्वदेवं समाचरेत् ।
( लघु. आश्व स्मृति १. १६ )

### वैश्वदेवाची पूर्वपीठिका

सध्या देवपूजेला जें महत्त्व आहे, तें प्राचीन काळीं अग्निपूजेला होतें. पंचमहायज्ञ नित्य केलेच पाहिजेत म्हणून अग्नींत आहुति देऊन सकाळ संध्याकाळ अग्निकार्य अर्थात् वैश्वदेव केला जाई. घरांतील कुंडात अग्नि सारखा जागृत ठेवला जाइ, आणि त्यामध्ये सकाळ संध्याकाळ आहुति दिल्या जात. घरामध्यें सतत जागृत ठेवलेल्या ह्या अग्नीस ' अग्निहोत्र ' असे म्हणत

प्राचीन काळीं अग्निहोत्राचीं तीन स्वतंत्र कुंडं प्रत्येक घरात ठेवलीं जात. पुढे अग्निहोत्राचीं हीं तीन कुंडं मागें पडून एकाच कुंडांत अग्नि जागृत ठेवण्याची प्रथा सुरू झाली ह्या अग्नीला ' स्मार्त ' अथवा ' गृह्य ' अग्नि असे म्हणत

प्राचीन यज्ञसंस्थेचा अवशेष या नात्यानें वैश्वदेव करण्याची चाल अगदीं अलिकडेपर्यंत चालू होती परंतु कालांतरानें हे नियम मागे पडून त्याची

जागा देवपूजेनें घेतली. या कारणानें यज्ञसंस्था आणि तिचें प्रतीकरूप असणारा वैश्वदेव आज घरातून प्राय: लुप्त झाल्याचें दृश्य दिसत आहे.

### वैश्वदेवाचा उद्देश

मनुष्यप्राणी जें अन्न खातो, यामध्यें देव, मनुष्य, पशु, पक्षी आदि सर्वांचा वाटा असतो. त्याचा हा वाटा त्यास अर्पण केल्याखेरीज मनुष्यमात्रानें अन्नग्रहण करणें हें पाप आहे, या कल्पनेवर वैश्वदेवाची उभारणी झालेली आहे. या कल्पनेमधूनच देवयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ आदि पंचमहायज्ञांचा समावेश वैश्वदेवाच्या नित्यकर्मात करण्यात आलेला आहे.

वैश्वदेवाच्या संबंधात 'पंचसूनादोषाच्या' परिहारासाठीं वैश्वदेवकर्म करीत असल्याचा उल्लेख सापडतो.

मनुष्याच्या हातून पांच प्रकारांनी हिंसा दररोज होत असते. उखळामध्यें कांडणें, जात्यानें दळणें, चुलीमध्यें अग्नि सिद्ध करणें, पाणी आणणें आणि सुरीनें कापडणें हे तिचे पांच प्रकार होत. हीं पांच कृत्यें मनुष्यास अवश्य करावीं लागतात. त्यामुळें अनेक प्राणिमात्रांची हिंसा घडते. हें पातक दूर व्हावें याकरितां वैश्वदेव करण्यास सांगितलें आहे.

### वैश्वदेव म्हणजे काय ?

विश्व म्हणजे सर्व. सर्वांना आपल्या अन्नातील भाग अर्पण करणें याला वैश्वदेव म्हणतात. वैश्वदेवात देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ व मनुष्ययज्ञ यांचा समावेश होतो. पंचमहायज्ञांपैकीं हे चार वैश्वदेवात होतात. पांचवा ब्रह्मयज्ञ तो पुढें वेगळा दिला आहे.

### वैश्वदेव कोणी केव्हां व कसा करावा ?

वैश्वदेव प्रत्येक कुटुंबात प्रमुखानें करावा, स्वैपाक वेगळा झाला कीं वैश्वदेव वेगळा करावा लागतो.

पूर्वी सकाळीं व सायंकाळीं असा दोन वेळ वैश्वदेव करीत, पुढें एकदा सकाळींच वैश्वदेव करण्याची पद्धत सुरू झाली.

वैश्वदेव घरांतील शुद्ध जागीं वैश्वदेवाच्या कुंडात अग्नि घेऊन करतात. अग्नि चांगला प्रज्वलित करून त्यात आहुति देतात.

# वैश्वदेवान्तर्गत धार्मिक कृत्यें

## वैश्वदेव कसा करतात

वर सांगितल्याप्रमाणे वैश्वदेवामध्यें पंचमहायज्ञाचा समावेश होतो, यापैकीं देवयज्ञ, मनुष्ययज्ञ आणि पितृयज्ञ अग्नींत आहुति देऊन करतात. त्यासाठी थोडा भात घेऊन त्यावर अन्नशुद्धि म्हणून तूप घालतात. या भाताचे तीन भाग करतात. यापैकी पहिल्या भागातील भातानें अग्नीस आहुति देतात. दुसऱ्या भागानें भूतयज्ञ (बलिहरण) करतात. आणि तिसऱ्या भागानें घराबाहेर जाऊन काकबलि देतात.

## वैश्वदेवान्तर्गत चार महायज्ञ

वैश्वदेवामध्यें खालील चार यज्ञाचा समावेश होतो —

### १. देवयज्ञ

हा यज्ञ वैश्वदेवांत अन्य यज्ञाच्या अगोदर अग्नीमध्यें आहुति देऊन केला जातो. या यज्ञांत एकदर १६ आहुति दिल्या जातात. या आहुतींचे मंत्र आणि त्यांचें सविस्तर विवरण 'वैश्वदेव प्रयोगांत' देण्यात आले आहे.

### २. भूतयज्ञ

भूतयज्ञ आणि बलिहरण एकच होय. देवतापेक्षा कमी प्रतीच्या आणि मनुष्यापेक्षा अधिक सामर्थ्यसंपन्न अशरीरितो भूतयज्ञ असतो. त्यांत ज्या देवतांचीं नावें आलेलीं आहेत, त्याचा अर्थ त्या देवतांचे अधिक भाग असलेले जीव तें येथे 'भूत' शब्दानें अपेक्षित आहेत आपलें जीवन सुरक्षित रहाण्यास सृष्टींतील अनेक शक्तींच्या सहकार्याची आपणास आवश्यक्ता आहे हें येथें सुचविलें आहे.

हा यज्ञ देवयज्ञनंतर आणि देवयज्ञाच्या अग्निकुंडाच्या उत्तर बाजूस जमिनीवर आहुति देऊन करतात. या आहुति देण्याचा क्रम आणि त्यांची जागा या परंपरेनें निश्चित केलेल्या आहेत या यज्ञांतील तसेंच मनुष्ययज्ञ आणि पितृयज्ञांतील आहुतींच्या जागा खोलाच्या आहुतिचक्रांत, दाखविल्याउ आल्या आहेत (पृष्ठ १८४ पहा).




वैश्वदेवतान्तर्गत आहुतिचक्र

भूतयज्ञाच्या आहुति ऋग्वेदी लोकांत वर्तुळाकार पद्धतीनें दिल्या जातात शाखाभेदानुसार चौकोनी पद्धतीनें आहुति देण्याची पद्धत काहीं ठिकाणीं रूढ आहे परंतु आम्ही वर्तुलाकार रचनाच केवळ दिली आहे

प्राचीन काळीं भूतयज्ञ हा देवयज्ञाच्या अग्निकुंडानजीक न करता घराच्या वेगवेगळ्या भागांत जाऊन केला जात असे, असे 'मृच्छकटिक' नाटक, 'मनुस्मृति (३ ८८), महाभारत (म अनु ९७) आदि ग्रंथावरून दिसतें देवयज्ञाच्या अग्निकुंडानजीक भूतयज्ञ करण्याची प्रथा नंतरच्या काळांत रूढ झाली असावी

सध्याचे काळांत भूतयज्ञ न करता केवळ देवयज्ञ करण्याची पद्धत काहीं ठिकाणीं दिसून येते पुण्यांतील पर्वती देवस्थानांत, तसेंच त्र्यंबकेश्वर मंदिरांत केवळ देवयज्ञच केला जातो तोहि होत नसल तर अग्नींत चार आहुति टाकून घरांतील जुन्या काळच्या बायका वैश्वदेवाचे काम भागवितात

३ पितृयज्ञ

हा यज्ञ भूतयज्ञानंतर 'प्राचीनावीती' म्हणजे जानवें डावीकडे करून करतात, 'स्वधा पितृभ्य स्वाहा' आणि 'शामाय शबलाय स्वाहा' या दोन आहुति दिल्यानें हा यज्ञ पुरा होतो

४ अतिथियज्ञ

हा यज्ञ 'सनकादिमनुष्येभ्यो हन्त' अशी आहुति देऊन केला जातो या ठिकाणीं 'हन्त' शब्दाचा अर्थ '१६ घास' असा आहे

आयत्या वेळीं आलेल्या अतिथीस भोजन घालून तृप्त करणें हा अतिथि यज्ञाचा महत्त्वपूर्ण भाग समजला जातो

वैश्वदेवान्तर्गत काहीं गौण कृत्यें

वैश्वदेवाचें मुख्य कृत्य संपल्यानंतर खालील गौण कृत्यें करण्याची पद्धत सर्वत्र रूढ आहे —

१. काकबलि

वैश्वदेव झाल्यानंतर घराच्या बाहेर जाऊन काकबलि देण्याची पद्धति आहे. आपल्या अन्नाचा घासभर तरी भाग पशुपक्षांना देण्याची भावना 'काकबलि' मध्ये अनुस्यूत आहे.

२. गोग्रास

भोजनापूर्वी घासभर अन्न अथवा मूठभर कच्चे धान्य वेगळें पाडून ठेवून तें 'गोग्रास' म्हणून गाईला खाऊ घालण्यात येतें. गोग्रासामागील भावना गोरक्षण करणं हीच आहे.

卐 卐

## 'वैश्वदेव' नित्यकर्माची सद्यःस्थिति

अशा तऱ्हेनें आपल्या अन्नातील प्राणीमात्र आणि भूतमात्र या सर्वांचे वाटे देऊन शिल्लक राहिलेलें अन्न स्वतः भक्षण करण्याचा उद्देशपर वैश्वदेव नित्यकर्मात ग्रथित करण्यात आला आहे. त्यातील उदात्तता वाखाणण्याजोगी आहे.

बदलत्या कालमानानुसार वैश्वदेव नित्यकर्म आज जवळ जवळ लुप्त झालेलें दिसत आहे. सध्या घरात गाई नसतात. त्यामुळें गवरीहि नसते. लाकूड, कोळसे जाऊन त्यांची जागा रॉकेल आणि गॅसनें घेतली आहे. घरातील जेवणाची एकत्र पंगत आज नष्ट झाली आहे. तांबूलहि दुर्मिळ झाला आहे. यामुळे घरातील वैश्वदेव जवळ जवळ नष्ट झाला.

परंतु या नित्यकर्मामागील भावना लक्षात घेऊन त्याचें कोणत्या ना कोणत्या स्वरूपात पुनरुज्जीवन करणं आवश्यक आहे. या भावनेनेंच वैश्वदेवाचा सविस्तर धार्मिक विधि सोबत देण्यात आला आहे.

卐 卐 卐

# वैश्वदेव

卐

## अनुक्रम

卐

# वैश्वदेवः ।



## ( १ ) देवयज्ञः

( अग्नेः पश्चात् प्राङ्मुख उपविश्य आचम्य प्राणान् आयम्य )

१. संकल्प :

पञ्चसूनादोषपरिहारार्थं तद्द्वारा
श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायंप्रातर्वैश्वदेवाख्यं कर्म तन्त्रेण करिष्ये ।

---

## ( १ ) देवयज्ञ

( आचमन व प्राणायाम केल्यानंतर )

१. संकल्प

'पंचसूनादोष' नामक हिंसादोषांचे क्षालन करण्यासाठी आणि तद्द्वारा परमेश्वरास प्रसन्न करण्यासाठी सकाळचा आणि संध्याकाळचा 'वैश्वदेव' एकदमच करतो, असा संकल्प सोडावा.

'पंचसूनादोषांचे' सविस्तर विवरण वैश्वदेवाच्या प्रास्ताविकांत देण्यांत आले आहे. वैश्वदेव दररोज सकाळीं व संध्याकाळीं करावयाचा असतो. परंतु सध्या दोन्ही वेळचा मिळून एकदा दुपारींच तो करण्यांत येतो.

२. अग्नि–आवाहनम्

जुष्टो दमूना आत्रेयो वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् ॥
एह्यग्ने राहूगणो गौतमोऽग्निस्त्रिष्टुप् ॥
अग्न्यावाहने विनियोगः ॥

ॐ जुष्टो दमूना अतिथिर्दुरोण
इमं नो यज्ञमुप याहि विद्वान् ।
विश्वा अग्ने अभियुजो विहत्या
शत्रुयतामा भरा भोजनानि ॥ १ ॥
एह्यग्न इह होता निषीदा–
दब्धः सु पुरएता भवा नः ।

२ अग्नि–आवाहन

'जुष्टो दमूना' या मंत्राचा वसुश्रुत आत्रेय हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप् हा छंद होय.

'एह्यग्ने' या मंत्राचा गौतम राहुगण हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप् हा छंद होय.

अग्नीचें आवाहन करणे हा उपर्युक्त दोन्ही मंत्रांचा हेतु आहे. हे दोन्ही मंत्र म्हणून आणि अक्षता वाहून अग्नीला आवाहन करावे व त्यावरील आच्छादन दूर करावे.

१. हे अग्ने, अतिशय उदार असा तू विद्वान् अतिथीसमान आम्हांस पूज्य आहेस. आमच्या यज्ञरूपी घरात तू प्रवेश कर आणि सर्व शत्रूंना नाहींसे करून त्यांचे धनधान्यादि हरण कर.

२. हे अग्ने, देवांना आवाहन करणारा तू आहेस, तू येथें बसून आमचा

अर्वांचं त्वा रोदंसी निश्चमिन्ने
यजामहे सौमनसाय देवान् ॥ २ ॥

३ अग्नि-स्थापना

समस्तव्याहृतीना परमेष्ठी
प्रजापति प्रजापतिर्बृहती ।
अग्निप्रतिष्ठापने विनियोग ॥
ॐ भूर्भुव स्व । रुक्मकनामानमग्निं प्रतिष्ठापयामि ॥ (प्रोक्षिते न्धनानि निक्षिप्य वेणुधमन्या प्रबोध्य ध्यायेत् )

४ अग्नि-ध्यानम्

चत्वारि शृगा गौतमो वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ अग्निमूर्तिध्याने विनियोग ॥

---

३ अग्नि-स्थापना

'समस्त व्याहृती' या मत्राचा परमेष्ठी प्रजापति हा ऋषि, प्रजापति ही देवता आणि बृहती छद होय. अग्नीची स्थापना करण्यासाठी या मत्राचे पठन केले जाते

'समस्त व्याहृती' चे पठन करून त्यानतर रुक्मक नामक अग्नीची मी स्थापना करतो, अशा अर्थाचा मत्र म्हणावा

४ अग्नि ध्यान

त्यानतर प्रोक्षण केलेल्या इन्धनानी अग्नि प्रज्वलीत करावा आणि 'चत्वारि शृगा' या मत्राने अग्नीचे ध्यान करावे

---

मार्गदर्शक आणि पुढारी हो अगादव्य असणारे उभय लोक तुझी उपासना करीत आम्ही (तुझ्या द्वारे) देवाची कृपा सपादन करण्याकरिता त्याचे पूजन करतो.

ॐ चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा
द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति
महो देवो मर्त्याँ आ विवेश ॥ ३ ॥

सप्तहस्तश्चतुःशृङ्गः, सप्तजिह्वो द्विशीर्षकः।
त्रिपात्प्रसन्नवदनः सुखासीनः शुचिस्मितः ॥ ४ ॥

स्वाहां तु दक्षिणे पार्श्वे, देवीं वामे स्वधां तथा।
बिभ्रद्दक्षिणहस्तैस्तु, शक्तिमन्नं स्रुचं स्रुवं ॥ ५ ॥

---

'चत्वारि शृंगा' या मंत्राचा वामदेव हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप् हा छंद होय. अग्नीच्या ध्यानाकडे उपयोग.

---

३. या अग्नीला चार शिंगे, तीन पाय, दोन मस्तकें, आणि सात हात आहेत. तीनहि लोकांस व्यापून उरणाऱ्या आणि वर्षाव करणारा अग्नि अत्यंत स्तविला जातो. असा हा महान् देव यजमान यज्ञामध्यें प्रज्वलित करतात.

४. या अग्नीला सात हात, चार शिंगे, सात जिभा, दोन मस्तकें आणि तीन पाय आहेत. त्याचें मुख प्रसन्न आणि सहास्य असून तो सुखानें आपल्या आसनावर बसलेला असतो.

(अग्नीच्या उपर्युक्त वर्णनात चार वेद हे त्याची चार शिंगे, उदात्त, अनुदात्त आणि स्वरित हे त्याचे तीन पाय, ब्रह्मौदन आणि प्रवर्ग्य नामक यज्ञ हे त्याची दोन मस्तकें, आणि सात छंद हे त्याचे सात हात मानण्यात आले आहेत.)

५. अग्नीच्या उजव्या बाजूस स्वाहा आणि डाव्या बाजूस स्वधा नामक त्याच्या बायका बसलेल्या आहेत. आपल्या उजव्या हातांमध्ये त्यानें शक्ति, अन्न, स्रुच, स्रुव आदि धारण केली आहेत.

तोमर व्यजन वामैर्घृतपात्रं च धारयन् ।
मेषारूढो जटाबद्धो, गौरवर्णो महौजसः ॥ ६ ॥
धूम्रध्वजो लोहिताक्षः, सप्तार्चिः सर्वकामदः ।
आत्माभिमुखमासीन, एवरूपो हुताशनः ॥ ७ ॥
अग्ने वैश्वानर शाण्डिल्यगोत्र मेषध्वज प्राङ्मुख देव मम संमुखो वरदो
भव ॥ ७–अ ॥

( इति ध्यात्वा परिसमूहनपर्युक्षणं कृत्वा )

---

उपर्युक्त मन्त्रांनी, अग्नीचें ध्यान करून 'परिसमूहन' आणि 'पर्युक्षण' करावे.
( परिसमूहन– ईशान्येस आरंभ करून उताणे हाताने वर्तुळाकार हात लावून चौफेर पाणी फिरवणें यास ' परिसमूहन ' असे म्हणतात. हे पाणी ईशान्येपासून ८ अंगुळेवर फिरवावे. परिसमूहन तीनदा करावे.
पर्युक्षण— ' पर्युक्षण ' म्हणजे वरीलप्रमाणें पाणी फिरविल्यावर अग्नीच्या वर्तुळाकार हात न लावता पाणी फिरविणे. हेहि वरीलप्रमाणें तीनदा करावयाचें असतें. )

अशाप्रकारें अग्नीचे ध्यान करून अग्नीच्या ईशान्य दिशेला प्रारंभ करून अग्नीस तीन वेळ पाण्याचे चौफेरी परिसमूहन करावे. त्याप्रमाणे

५. अग्नि-पूजनम्

विश्वानि न इति तिसृणामात्रेयो वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् । द्वयोरर्चनेऽन्त्याया उपस्थाने विनियोग ॥

ॐ विश्वा॑नि नो दु॒र्गहा॑ जातवे॒दः ॥८॥
ॐ सिन्धुं॒ न ना॒वा दु॑रि॒ताति॑ पर्षि ॥९॥
ॐ अग्ने॑ अत्रि॒वन्नम॑सा गृणा॒नः ॥१०॥
ॐ अ॒स्माकं॑ बोध्यवि॒ता त॒नूना॑म् ॥११॥

---

तीन वेळा परिषेचन करावें आणि पुढील मंत्र म्हणून प्रत्येक ऋचेनें अग्नीच्या भोंवती चौकोनी केलेल्या परिसमूहन वर सर्व भागाच्या मध्यापासून अक्षता ठेवण्यास सुरवात करावी. पूर्वच्या मध्यापासून क्रमानें मध्यें आणि कोपऱ्यावर अक्षता ठेवाव्या.

प्रत्येक दिशेस अक्षता ठेवण्याकरिता ओळीनें एक एक मंत्राचा उपयोग करावा. अक्षता आठ दिशेस ठेवावयाच्या असतात त्याप्रमाणे मंत्रहि आठ आहेत. ह्या अक्षता परिसमूहनापासून तीन अगुलें पुढे ठेवाव्यात तथापि सर्वत्र प्रचार परिसमूहनावर अक्षता ठेवण्याच आहे.

५. अग्नि पूजन

'विश्वानि न.' या मंत्राचा अत्रिकुलोत्पन्न वसुश्रुत हा ऋषि, अग्नि ही देवता आणि त्रिष्टुप् हा छंद होय. या ऋचांपैकी ८-१३ या ऋचा अग्नीच्या पूजनाकरिता आणि १४-१५ या ऋचा अग्नीच्या स्तुतीकरिता म्हटल्या जातात.

---

८-९ हे अग्ने, आम्हाला भोगण्यास कठिण असणाऱ्या सर्व पातकांतून नावाडी समुद्राच्या पार नेतो त्याप्रमाणें पार पाड.

१०-११. हे अग्ने, अत्रि ऋषीप्रमाणे आम्हाकडून स्तविला जाणारा तू आमच्या शरीराचा रक्षक आहेस.

ॐ यस्त्वा हृदा कीरिणा मन्यमानः ॥ १२ ॥

ॐ अमर्त्यं मर्त्यो जोहवीमि ॥ १३ ॥

ॐ जातवेदो यशो अस्मासु धेहि ॥ १४ ॥

ॐ प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ॥ १५ ॥

ॐ यस्मै त्वं सुकृते जातवेद
उ लोकमग्ने कृणवः स्योनम् ।
अश्विनं स पुत्रिणं वीरवन्तं
गोमन्तं रयिं नशते स्वस्ति ॥ १६ ॥

६ अग्नि-उपस्थानम्

आज्यमान स्थाल्युद्धृत्य, हस्त प्रक्षाल्य, सिद्धमन्नमग्नावधिश्रित्य, उदगुद्वास्य, प्रोक्ष्य, अग्ने पश्चिमतो निधायाभिघार्य, त्रिधा विभज्य, सव्य पाणितल

---

६. अग्नि उपस्थान

नंतर हविर्योग्य शिजविलेले अन्न एका पात्रावर किंवा पानावर उचलून घेऊन ते पात्र अग्नीवर तापवून प्रोक्षण करून काढून अग्नीच्या पश्चिमेस ठेवावे तीन भाग करून तूप घालून छातीवर डावा हात ठेवून उजव्या

हृदि न्यस्य, दक्षिणहस्तेन दक्षिणभागादर्द्धमन्नमग्निमनसादायांगुष्ठाग्रेण पीडित मध्यमानामिकांगुष्ठयुक्तानामिकया प्रणवादिरहित स्वाहान्ते सूर्यादभ्यो जुहुयात् ॥

७ आहुतिप्रदानम्

१ सूर्याय स्वाहा । सूर्याय इदं न मम ॥
२ प्रजापतये स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥
३ अग्नये स्वाहा । अग्नय इदं न मम ॥
४ प्रजापतये स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥
५ सोमाय वनस्पतये स्वाहा । सोमाय वनस्पतय इदं न मम ॥
६ अग्नीषोमाभ्यां स्वाहा । अग्नीषोमाभ्याम् इदं न मम ॥
७ इन्द्राग्निभ्यां स्वाहा । इन्द्राग्निभ्याम् इदं न मम ॥
८ द्यावापृथिवीभ्यां स्वाहा । द्यावापृथिवीभ्याम् इदं न मम ॥
९ धन्वन्तरये स्वाहा । धन्वन्तरय इदं न मम ॥
१० इन्द्राय स्वाहा । इन्द्राय इदं न मम ॥
११ विश्वेभ्यो देवेभ्य स्वाहा । विश्वेभ्यो देवेभ्य इदं न मम ॥
१२ ब्रह्मणे स्वाहा । ब्रह्मण इदं न मम ॥
१३ भू स्वाहा । अग्नय इदं न मम ॥

---

बाजूच्या अन्नातून जागीनी आपल्या आवळ्याएवढे अन्न घेऊन ओंकार न म्हणता शेवटी स्वाहा म्हणून पुढील आहुती द्याव्यात आहुती टाकू नयेत, फेकू नयेत, अपण करण्यासारख्या द्याव्यात

७ आहुतिप्रदान

आहुति दिल्यानंतर पूर्वीप्रमाणें तीनदा परिसमूहन आणि पर्युक्षण करावें आणि 'विश्वानि' हा मंत्र म्हणून पूर्वीच्याच जागी पूर्वीप्रमाणें अक्षता ठेवाव्यात, नंतर गंध, फुलांनी अग्नीची पूजा करावी

१४ भुव. स्वाहा । वायव इदं न मम ॥
१५ स्वः स्वाहा । सूर्याय इदं न मम ॥
१६ भूर्भुव. स्व' स्वाहा । प्रजापतय इदं न मम ॥

८. विभूतिग्रहणम्

मानस्तोक इत्यस्य कुत्सो रुद्रो जगती ।
विभूतिग्रहणे विनियोग ।

ॐ मा नंस्तोके तनंये मा नं आयौ
मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।
वीरान् मा नो रुद्र भामितो वधी–
र्हविष्मन्तः सदमित् त्वा हवामहे ॥१७॥

त्र्यायुष जमदग्ने, ललाटे ॥ १८ ॥
कश्यपस्य त्र्यायुष, कण्ठे ॥ १९ ॥

---

८. विभूतिग्रहण

'मानस्तोक' ह्या मंत्राचा कुत्स हा ऋषि, रुद्र ही देवता आणि जगती हा छंद होय.

हा मंत्र म्हणून पळीनें अग्नीचें भस्म घ्यावें व पुढील मंत्र म्हणून लावावें

---

१७. हे रुद्रा, आमची मुले, नातू, आमचे सबधी लोक, गाई आणि पशू व घोडे याना मारू नकोस. आम्ही हविर्भाग घेऊन तुला नेहमीं बोलावीत जाऊ.

१८. तीन वेळा जमदग्नीचा अपमृत्यु टाळणारें हें भस्म मी कपाळावर धारण करतो हें भस्म जमदग्नीप्रमाणें माझाहि अपमृत्यु टाळो.

१९ कश्यपाचें तीनदा अपमृत्यूतून सरंक्षण करणारें हें भस्म मी कंठाच्या ठिकाणी धारण करतो.

अगस्त्यस्य त्र्यायुष, नाभौ ॥ २० ॥
यद्देवानां त्र्यायुष, दक्षिणस्कन्धे ॥ २१ ॥
तन्मे अस्तु त्र्यायुष, वामस्कन्धे ॥ २२ ॥
सर्वमस्तु शतायुष, शिरसि ॥ २३ ॥

## ९. अग्नि प्रार्थना

श्रद्धा मेधा यशः प्रज्ञां, विद्यां बुद्धिं श्रिय बलम् ।
आयुष्यं तेज आरोग्य, देहि मे हव्यवाहन ॥ २४ ॥
प्रमादात्कुर्वतां कर्म, प्रच्यवेताध्वरेषु यत् ।
स्मरणादेव तद्विष्णोः, सपूर्णम् स्यादिति श्रुति ॥ २५ ॥

---

२०. अगस्त्य महर्षीला ज्या भस्मानें तीनदा अपमृत्यूतून टाळलें तें भस्म मी नामीच्या ठिकाणीं धारण करितो.

२१. ज्यानें देवांना तीनदा अपमृत्यूतून तारिलें तें भस्म मी उजव्या खांद्यावर धारण करितो

२२ तीनदां अपमृत्यूतून सरक्षण करणारे तें भस्म माझ्या डाव्या खांद्याच्या ठिकाणीं असो.

२३. ( मला अपमृत्यु न येतां ) पूर्ण शभर वर्षे आयुष्य असो, म्हणून हें भस्म मी मस्तकावर धारण करितो.

## ९ अग्नि-प्रार्थना

२४. हे अग्ने, आस्तिक्यबुद्धि, मनाचे सामर्थ्य, कीर्ति, मेंदूचे सामर्थ्य, विद्या, ज्ञान, संपत्ति, बल, दीर्घायुष्य, तेजस्वीपणा आणि आरोग्य हीं मला दे.

२५. चुकीमुळें ह्या कर्मांत जें कांहीं चुकलें असेल तें विष्णूच्या स्मरणानें संपूर्ण होतें असें वेदांत सांगितलें आहे, म्हणून मी विष्णूचें स्मरण करितो.

अनेन प्रातः सायं वैश्वदेवांगहोमाख्येन कर्मणा भगवान् यज्ञरूपी परमेश्वरः प्रीयताम् ॥

卐 卐

## ( २ ) भूतयज्ञः

( आचम्य प्राणान् आयम्य, भूमिं प्रोक्ष्य मध्यभागादन्नमादाय प्राचीमारभ्य ईशानीपर्यंतं चक्राकारं नैरृत्येण भूमौ )

१. आहुतिचक्रम्—

१ सूर्याय स्वाहा ॥
२ प्रजापतये स्वाहा ॥
३ अग्नये स्वाहा ॥
४ प्रजापतये स्वाहा ॥
५ सोमाय वनस्पतये स्वाहा ॥
६ अग्नीषोमाभ्यां स्वाहा ॥
७ इन्द्राग्निभ्यां स्वाहा ॥
८ द्यावापृथिवीभ्यां स्वाहा ॥
९ धन्वन्तरये स्वाहा ॥
१० इन्द्राय स्वाहा ॥
११ विश्वेभ्यो देवेभ्य स्वाहा ॥

---

ह्या सकाळ संध्याकाळच्या वैश्वदेवाला अंगभूत असणाऱ्या होमरूप कर्माने भगवान यज्ञरूपी परमेश्वर प्रसन्न होवो.

卐 卐

## ( २ ) भूतयज्ञ

देवयज्ञ झाल्यावर आचमन प्राणायाम करून भूयज्ञाकरिता भूमि प्रोक्षण करावी आणि खाली दिल्याप्रमाणे आहुति द्याव्यात.

२. आहुतिचक्र

भूतयज्ञाच्या अंतर्गत एकूण ३२ आहूति दिल्या जातात. यांपैकी '१ सूर्याय स्वाहा'पासून '१७ वास्तुदेवताभ्य स्वाहा,' या १७ आहुति चक्राकार पद्धतीने द्याव्यात भूतयज्ञान्तर्गत या आहूतिचक्राची आकृति आणि सविस्तर विवरण वैश्वदेवाच्या प्रास्ताविकांत दिले आहे.

१२ ब्रह्मणे स्वाहा ॥
१३ अद्भ्य स्वाहा ॥
१४ ओषधिवनस्पतिभ्य स्वाहा ॥
१५ गृहाय स्वाहा ॥
१६ गृहदेवताभ्य स्वाहा ॥
१७ वास्तुदेवताभ्य स्वाहा ॥

२ चक्राद्बहि प्राच्या प्राक्संस्थम्

१८ इन्द्राय स्वाहा ॥
१९ इन्द्रपुरुषेभ्य स्वाहा ॥

३ दक्षिणत उदक्संस्थम्

२० यमाय स्वाहा ॥
२१ यमपुरुषेभ्य स्वाहा ॥

४ पश्चिमत प्राक्संस्थम्

२२ वरुणाय स्वाहा ॥
२३ वरुणपुरुषेभ्य स्वाहा ॥

५ उत्तरस्यामुदक्संस्थम्

२४ सोमाय स्वाहा ॥
२५ सोमपुरुषेभ्य स्वाहा ॥

---

२ चक्राच्या बाहेर पूर्वेस
नतर १८ आणि १९ या आहूति चक्राच्या बाहेर पूर्वेस द्याव्यात.

३ चक्राच्या बाहेर दक्षिणेस
नतर २० आणि २१ या आहूति चक्राच्या बाहेर दक्षिणेस द्याव्यात.

४. चक्राच्या बाहेर पश्चिमेस
नतर २२ आणि २३ या आहूति चक्राच्या बाहेर पश्चिमेस द्याव्यात

५ चक्राच्या बाहेर उत्तरेस
नंतर २४ आणि २५ या आहूति चक्राच्या बाहेर उत्तरेस द्याव्यात

६. चक्रमध्ये

२६ ब्रह्मणे स्वाहा ॥

२७ ब्रह्मपुरुषेभ्यः स्वाहा ( ब्रह्मणो दक्षिणतः ) ॥

२८ विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥

७. ब्रह्मण पश्चिमतः

२९ सर्वेभ्यो भूतेभ्यः स्वाहा ॥

८. ब्रह्मण उत्तरतः

३० दिवाचारिभ्यः स्वाहा ॥

३१ नक्तचारिभ्य. स्वाहा ॥

९. चक्रादुत्तरत

३२ रक्षोभ्य स्वाहा ॥

卐 卐

## ( ३ ) पितृयज्ञ.

३३ स्वधा पितृभ्य' ॥

---

६-८. चक्राच्या आत

नतर चक्राच्या मध्यभागीं ' २६. ब्रह्मणे स्वाहा ' ही आहूति देऊन त्याच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर बाजूस क्रमानें एक एक आहूति द्यावी.' ३०. दिवाचारिभ्य ' याच्या शेजारीं ' ३१ नक्तचारिभ्य ' ही आहूति द्यावी

९. चक्राच्या बाहेर उत्तरेस

नतर ' सोमपुरुषेभ्य स्वाहा ' च्या शेजारीं ' ३२. रक्षोभ्य. स्वाहा ' ही आहूति द्यावी.

卐 卐

## ( ३ ) पितृयज्ञः

नतर पितृयज्ञाच्या ३३ ते ३० या आहुति क्रमशः भूतयज्ञाच्या आग्नेय,

३४ श्यामाय स्वाहा ॥
३५ शबलाय स्वाहा ॥

卐 卐

## ( ४ ) मनुष्ययज्ञ

३६ सनकादिमनुष्येभ्यो हुत । इद न मम ॥

卐 卐

## ( ५ ) काकबलि

( गृहाद्बहिः )

ऐन्द्रवारुणवायव्या, याम्या नैर्ऋतिकाश्च ये ।
ते काकाः प्रतिगृह्णन्तु, भूम्यां पिंड मयोज्झितम् ॥ ३६ ॥

---

नैर्ऋत्य आणि वायव्य दिशेस द्याव्यात.

पितृयज्ञासाठीं आहुति देण्याची पद्धति खालीलप्रमाणे आहे. आग्नेय दिशेला तोंड करून प्राचीनावीति करावी आणि नतर अन्नाच्या तिसऱ्या भागांतील अंगठ्याच्या पेऱ्याएवढें अन्न घेऊन तें उलथुन हाता गुडघा जमिनीला टेंकून' स्वधा पितृभ्य. ' असे उच्चारून उताणा हात करावा आणि पितृतीर्थानें आहुति द्यावी. पितृतीर्थ म्हणजे अंगठा आणि अंगठ्याजवळचें बोट यामधील जागा होय.

卐 卐

## ( ४ ) मनुष्ययज्ञ

नतर ३६ सनकादि० ही मनुष्ययज्ञाची आहुति भूतयज्ञाच्या ईशान्य दिशेस द्यावी.

卐 卐

## ( ५ ) काकबलि

काकबलि देण्याकरितां रस्त्यावर यावें आणि सर्व मंत्र म्हणून दोन्हीं हातात

वैवस्वतकुले जातौ, द्वौ श्यामशबलौ शुनौ ।
ताभ्यां पिंडो मया दत्तो, रक्षेतां पथि मां सदा ॥ २७ ॥

ये भूताः प्रचरंति दिवानक्तं,
बलिमिच्छन्तो वितुदस्य प्रेष्याः ।
तेभ्यो बलिं पुष्टिकामो ददामि,
मयि पुष्टिं पुष्टिपतिर्ददातु स्वाहा ॥ २८ ॥

(बलिप्रदानोत्तरमङ्गण एत गोदोहनमात्रं स्थित्वातिथिमाकङ्क्षेत् । प्रक्षालितपाणिपाद आचम्य गृहं प्रविशेत् )

卐 卐 卐

---

आणलेलें अन्न जमिनीवर किंवा दगडावर पाणी शिंपून त्यावर ठेवावें. नंतर कोणी अतिथि भेटल्यास त्याला घरांत आणून यथाशक्ति अन्न द्यावें.

---

२६–२७. पूर्व, पश्चिम, वायव्य, दक्षिण आणि नैऋत्य ह्या दिशांस जे कावळे असतील त्या कावळ्यांनीं मी जमिनीवर ठेवलेला हा अन्नाचा पिंड ग्रहण करावा. वैवस्वत कुलामध्यें श्याम आणि शबल नांवाचे दोन कुत्रे झाले. त्यांना मी हा पिंड दिलेला आहे. त्यांनीं माझें मार्गामध्यें नेहमीं संरक्षण करावें.

२८. रात्रंदिवस लोकांना त्रास देत आणि बलीची इच्छा करीत जे दुष्ट प्राणी हिंडत असतात, त्यांना हा बलि मला आरोग्य प्राप्त व्हावें म्हणून मी अर्पण करतों.

卐 卐 卐

स गच्छध्व स वदध्व, सं वो मनासि जानताम् ।
देवा भाग यथा पूर्वे, सजानाना उपासते ॥ (ऋ. १०.१९२.२)

लोकहो, तुम्ही एक विचाराचे आणि एक आचाराचे व्हा. तुमचें ज्ञान पूर्ण असू द्या.

तुम्ही आपले पूर्वजाचे पावलावर पाऊल टाकून आपलीं कार्यें एकदिलानें, निश्चयानें आणि निर्भयपणानें शेवटास न्या.

## ब्रह्मयज्ञाविषयीं थोडें प्रास्ताविक

यत् स्वाध्यायमधीते स ब्रह्मयज्ञ ॥
(आश्वलायन गृह्यसूत्र)

### ब्रह्मयज्ञ म्हणजे स्वाध्याय

देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ आणि ब्रह्मयज्ञ असे पाच यज्ञ मिळून प्राचीन धर्मशास्त्रात वर्णिलेल्या पचमहायज्ञाची सांगता होतें. यापैकी पहिले चार यज्ञ वैश्वदेवात अतर्भूत होतात पाचवा ब्रह्मयज्ञ स्वतत्रपणें वैश्वदेवाच्या अगोदर करावयाचा असतो

प्रतिदिन काहीं ठराविक वेदमत्राचें पठन करणें हा ब्रह्मयज्ञाचा प्रमुख हेतु आहे यासच धर्मशास्त्रात 'स्वाध्याय म्हणणें' अशी संज्ञा दिली आहे. या स्वाध्यायानें पठन ई ब्रह्मयज्ञांतील मुख्य कृत्य असून देव, ऋषि, आचार्य आणि पितर यांचें तर्पण हें गौण कर्म होय पुष्कळ लोक तर्पण आणि त्यातहि पितृतर्पण हें ब्रह्मयज्ञातील मुख्य कर्म मानतात आणि त्यापासून स्वत स आणि स्वत चे मुलांस दूर ठेवण्याचा प्रयत्न करतात. परंतु असे करणें म्हणजे ब्रह्मयज्ञाच्या मूळ हेतूचा विपर्यास करणें होय

## ब्रह्मयज्ञाचें महत्त्व

नित्यकर्मांत ब्रह्मयज्ञाचा समावेश करून वेदादि प्राचीन धर्मग्रंथांना मुखोद्‌गत आणि जिवंत ठेवण्याची व्यवस्था आपल्या पूर्वजांनीं करून ठेवली आहे. आपल्या धर्माचे आद्य ग्रंथकार कोण, त्यांच्या ग्रंथांचा प्रारंभ कोणत्या वाक्यापासून होतो आणि या ग्रंथांचें परिशीलन आपल्या हातून प्रतिदिन कसें घडेल, या सर्व गोष्टींचा विचार करून 'ब्रह्मयज्ञ' या नित्यकर्माची रचना करण्यांत आलेली आहे.

आमच्या थोर पूर्वजांचे वंशज म्हणवून घेण्याची पात्रता आम्हांस यावयाची असेल तर त्यांच्या ग्रंथांचें परिशीलन करणें हा एकच मार्ग आज उपलब्ध आहे. या परिशीलनाचा आणि स्वाध्यायाचा व्यवहार्य उपाय म्हणजे 'ब्रह्मयज्ञ' करणें हा होय.

म्हणूनच या स्वाध्यायाला आणि स्वशाखाध्ययनाला विशेष महत्त्व आमच्या सार्‍या धर्मग्रंथांत आणि पुराणांत देण्यांत आलें आहे.—

स्वशाखाध्ययनं विप्र ब्रह्मयज्ञ इति स्मृतः।

(लिंगपुराण)

## ब्रह्मयज्ञ कोणी करावा ?

उपनयन झालेल्या प्रत्येक मुलानें आणि प्रौढानें ब्रह्मयज्ञ केला पाहिजे. ज्यांचा पिता विद्यमान आहे अशांनीं ब्रह्मयज्ञांतर्गत पितृतर्पण फक्त करावयाचें नाहीं; परंतु बाकी सर्व कृत्यें केलीच पाहिजेत असा धर्मशास्त्राचा दंडक आहे.

उपनयनाच्या दिवशीं संध्याकाळीं संध्येला ज्याप्रमाणें प्रारंभ आरंभ होतो, त्याप्रमाणेंच प्रत्येकानें दुसर्‍या दिवसापासून ब्रह्मयज्ञास आरंभ करावयाचा असतो. मुंज झालेल्या मुलास दुसर्‍या दिवशीं गायत्री मंत्राशिवाय नवीन कांहींच येत नसतें. तथापि तेवढा गायत्री मंत्र म्हणूनच त्यानें उपनयनाच्या दुसर्‍या दिवशीं ब्रह्मयज्ञाला म्हणजे स्वाध्यायविधीला आरंभ करावयाचा असतो.

या दृष्टीनें सर्व यज्ञांत ब्रह्मयज्ञ मुख्य आहे. म्हणून उपनयनापासूनच ब्रह्मयज्ञ करण्यास आरंभ करावा असें वैखानस धर्मप्रश्नांत म्हटलें असून निबंधकारांनींहि अनुवाद केला आहे--

सर्वयज्ञानामादिः ब्रह्मयज्ञ तस्मादुपनयनप्रभृत्येव द्विजैः कर्तव्यः ।
(वैखानस धर्मप्रश्न २. ७. १३)

यावज्जन्म सर्वांनी रात्री होईल तों, ब्रह्मयज्ञ अमक्यानीं करावा आणि अमक्यानीं करू नये असा कांहीं नियम नसून उपनयन झाल्यापासून सर्वांनीं ब्रह्मयज्ञ केलाच पाहिजे.

## ब्रह्मयज्ञ कोठें करावा ?

ब्रह्मयज्ञ विशेषत घराच्या बाहेर कोठें तरी नदी, तलाव वगैरे जलाशयासंनिध करणे हा उत्तम पक्ष. अशा स्थळीं स्वाध्याय मध्यम आवाजात म्हणावा परंतु गावात करणें झाल्यास मनानें वेदपठन करावें

ब्रह्मयज्ञात वेदपठन चालू असता ऋषि, देवता, छंद आणि प्रणव म्हणण्याची जरूरी नाहीं वेदपठनप्रसंगीं उभे राहिले असता, आडवे पडले असता, इकडून तिकडे फिरतें असता, चालत असतां चालते. अभ्यास करणें हें मुख्य तत्त्व आहे. मात्र जोंपर्यंत एकाग्र मन असेल तोंपर्यंतच अध्ययन करावें. अमुक इतके अध्याय म्हटले पाहिजेत असें नाहीं.

## ब्रह्मयज्ञ कसा करावा ?

वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्मयज्ञात स्वाध्याय हें मुख्य कृत्य आहे आणि तर्पण हें गौण कृत्य आहे. तर्पणासाठीं शक्यतो तांब्याचें अथवा पितळेचें ताम्हण घ्यावें. या कार्यासाठीं मातीचें भांडे घेणें हें सर्वथा निषिद्ध आहे. तसेंच तर्पणाचें पाणी जमिनीवर सांडू देणें हेंहि निषिद्ध आहे. तर्पण करीत असता पाणी हळू हळू सोडावें. तर्पणाची संततधार कधींहि सोडू नये.

दर्भ हे ब्रह्मयज्ञास अत्यंत आवश्यक आहेत. ब्रह्मांजलि आणि तर्पण याना दर्भ घेतले घ्यावेत. ब्रह्मांजलिकरिता अग्राचे दोन दर्भ घ्यावेत. देव, ऋषि, आचार्य व पितृ या सर्वांच्या तर्पणास एकदांच घेतलेले दर्भ चालतात. त्याप्रमाणेंच तीळहि पितृतर्पणास आवश्यक आहेत. तथापि त्यावाचून कर्म केव्हाहि टाळू नये. पितृतर्पणात तीळ आणि वेदाध्ययनप्रसंगीं दर्भ हे विशेष फलदायक आहेत इतकेंच हातात सोनें, रूप किंवा लोह असेल तर दर्भांची जरूरी नाहीं.

### काहीं वैकल्पिक प्रयोग

वेदमंत्रांशिवाय 'गाथा,' 'नाराशंसी' आणि 'पुराण' यांचाहि स्वाध्याय ब्रह्मयज्ञप्रसंगीं करावा असें सूत्रांत सांगितलें आहे. त्याप्रमाणें 'यदिन्द्रो दाशराज्ञे' हें गाथेच आद्यवाक्य, 'इदं जना उपश्रुत' हें नाराशंसीच आद्यवाक्य आणि पुराण म्हणून पहिलें पुराण जें ब्रह्मपुराण त्याचा पहिला श्लोक किंवा श्रीमद्भागवताचा पहिला श्लोक म्हणतात परंतु हा आचार साधार नाहीं. कारण सध्याचीं पुराणें हीं स्त्रीशूद्राकरितां आहेत आणि गाथा व नाराशंसी या संहितेच्यांत अंगभूत आहेत, म्हणून त्या संहितेत समाविष्ट होतात

### ब्रह्मयज्ञ केव्हां करू नये

ब्रह्मयज्ञाला फक्त दोनच 'अनध्याय' म्हणजे न म्हणण्याचीं कारणें आहेत एक सूतकादिकामुळें स्वतः अशान्त असणें किंवा स्थल अपवित्र असणें ही दोन होत यावरून ब्रह्मयज्ञाची सामान्य कल्पना येण्यास हरकत नाहीं

卐 卐

## ब्रह्मयज्ञान्तर्गत धार्मिक कृत्ये

### १ संकल्प व ब्रह्माञ्जलि

आचमन व प्राणायाम केल्यानंतर ब्रह्मयज्ञांत प्रारंभीं देव, ऋषी, आचार्य आणि पितर यांच्या तृप्तिद्वारां परमेश्वरप्राप्तीकरितां ब्रह्मयज्ञ करितो, असा संकल्प सोडून ब्रह्मयज्ञाला आरंभ करावा डाव्या गुडघ्यावर उजवा पाय ठेवून त्या उजव्या पायाच्या गुडघ्यावर डावा हात सरळ उंचें करून उताणा ठेवावा त्यांत दोंड्याचे वीतभर लांब दोन दर्भ घालून उजवा हात त्यावर पालथा करावा ह्यास 'ब्रह्माञ्जलि' असें म्हणतात

### २ गायत्री मंत्र

ब्रह्माञ्जलि केल्यानंतर ॐपूर्वक व्याहृति म्हणून गायत्री मंत्र पाद, अर्ध व संपूर्ण अशा क्रमानें तीनदां म्हणावा. असें म्हणतांना स्वरांत जो बदल होत

असतो, तो अवश्य ध्यानांत घ्यावा. पाद, अर्ध, संपूर्ण अशा क्रमानें मंत्र म्हणण्याचा उद्देश काय असावा हें बरोबर सांगता येत नाहीं. कदाचित् प्रथम उपदेशाप्रमाणें प्रथम पाद, आणि नंतर संपूर्ण मंत्र म्हणण्यास सांगितला असावा.

## ३. वेदमंत्रांचें पठन

नंतर ऋग्वेदाचा पहिला वर्ग 'अग्निमीळे' हा म्हणावा. तो म्हणताना मन एकाग्र आणि दृष्टि निमीलित किंवा क्षितिजाकडे लावावी. नंतर यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यांचा आरंभ म्हणावा.

एक वेद पुरा करून वेदाच्या पद्धतीस अनुसरून ब्राह्मण, आरण्यकें यांचीं आद्यवाक्यें आधीं म्हणून नंतर यजुर्वेदादि ग्रंथांचीं वाक्यें म्हणण्याची पद्धतीहि आहे. तीच थोर लोकांच्या प्रचारात असल्यामुळे आम्ही स्वीकारली आहे.

## ४. अन्य ग्रंथांचें पठन

नंतर आश्वलायन श्रौतसूत्र, यास्ककृत 'निरुक्त', छंद, निघण्टु, वेदांग ज्योतिष, पाणिनिकृत 'शिक्षा', अष्टाध्यायी, याज्ञवल्क्यस्मृति, महाभारत, कणादप्रणीत 'न्यायसूत्र', जैमिनिकृत 'पूर्वमीमांसा', व्यासकृत 'उत्तरमीमांसा' या क्रमाने ग्रंथांच्या प्रथम वाक्याचा उल्लेख आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत पुढीलप्रमाणें ग्रंथ म्हणावयास सांगितले आहेत–

अथ स्वाध्यायमधीयीत ऋचो यजूंषि सामान्यथर्वाङ्गिरसो ब्राह्मणानि कल्पान् गाथानाराशंसीरितिहासपुराणानीति (आ. गृ. ३-३)

(आपल्या शाखेचा वेद म्हणावा व नंतर ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, ब्राह्मण, सूत्र, गाथा, नाराशंसी, इतिहास म्हणजे भारत आणि पुराण या क्रमानें ग्रंथांचे अध्ययन करावें.)

यात वेदभेदानें काही फरक होतो, परंतु सामान्य स्वरूप एकच. आश्वलायन गृह्यसूत्रांतील ब्रह्मयज्ञासंबंधी जें वाक्य वर उद्धृत केलें आहे, त्यावरून कोणाच्याहि सहज लक्षांत येईल कीं सध्याच्या ब्रह्मयज्ञ प्रयोगांत त्यापेक्षां

पुष्कळच फरक झालेला आहे आरण्यक, उपनिषदें, शिक्षा, व्याकरण, पूर्व मीमांसा, उत्तरमीमांसा, याज्ञवल्क्यस्मृति, कणादप्रणीत न्यायसूत्र वगैरे ग्रंथांचा उल्लेख का केला आणि कोणत्या आधारानें केला वगैरे प्रश्न विचारण्यासारखे आहेत विशेषत मनु, पराशर सोडून याज्ञवल्क्यस्मृतीचा उल्लेख व न्याय सूत्राचा उल्लेख याची तर संगतीच लावता येत नाहीं.

### ५. देवतातर्पण

प्रजापति, ब्रह्मा वेद, देव, ऋषि, सर्व छन्द, ॐकार, वषट्कार, व्याहृति, सावित्री, यज्ञ, द्यावापृथ्वी, अन्तरिक्ष, अहोरात्र, सांख्य, सिद्ध, समुद्र, नदी, गिरी, क्षेत्र, औषधी वनस्पती, गंधर्व, अप्सरा, नाग, वयस्, साध्य, गो, विप्र यक्ष, रक्षस्, भूत, एवमन्त, या देवता घेतल्या आहेत

यांत कांहीं देवता समुदायरूप आहेत, आणि कांहीं व्यक्तिश आहेत परंतु या देवतांची निवड कोणत्या तत्त्वावर केली आहे, याचा उलगडा होत नाही त्यांत धड वेदांतील देवता नाहींत, धड पौराणिकहि नाहींत यांत विशेषत सांख्य, सिद्ध, नाग, यक्ष, हे उल्लेख विशेष चिन्तनीय आहेत आणि 'एवमन्त' हा निर्देश तर अगदीं प्रामादिक आहे

### ६. ऋषितर्पण

नंतर ऋषितर्पण. ऋषि म्हणजे मन्त्रद्रष्टे ज्यांना ईश्वरानें मन्त्र रूपानें ज्ञान दिलें ते ऋषि 'मन्त्रद्रष्टे' होत ऋषितर्पणांत ऋग्वेदक्रम पूर्णपणें स्वीकारला असून या शतर्चिन्, गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज, वसिष्ठ, प्रगाथ हीं नांवें मंडळवार क्रमानें आहेत परंतु बाकी माध्यम, पावमानी, क्षुद्रसूक्त, महासूक्त ही उल्लेख करावयाची पद्धति चमत्कारिक आहे म्हणजे ज्या मंडलकर्त्यांचा किंवा सूक्तकर्त्यांचा नामनिर्देश करणं सक्रयास्पद किंवा गैरसोयीचा होतें, त्याचा उल्लेख करण्याचें टाळून ज्या दैवी देणगीमुळे कर्त्यांना महत्त्व प्राप्त व्हावयाचे त्या दैवी देणगीचाच सामुदायिक उल्लेख करून द्रष्ट्याचे तर्पण करावयाचे, अशी पद्धति स्वीकारली आहे

ऋग्वेदाचें मंडळवार जें वर्गीकरण केलें आहे तें विशिष्ट तत्त्वावर केलें आहे एक मुख्य ऋषि आणि त्याच्या कुळांतील इतर यांनीं केलेल्या मन्त्रांचा संग्रह

एकेक मंडळांत केला आहे. परंतु ज्या ठिकाणीं कुलानुसार मंडळाची रचना करितां येईना, अशांचा संग्रह कांहीं मंडळांत केला आहे. दोनपासून सात मंडळें कुलानुसार आहेत. प्रथम मंडळांतहि बहुतेक तसें आहे. परंतु आठ, नऊ व दहा हीं मंडळें कुलानुसार नाहींत, आठ व नऊ विषयावर व दहावें समहात्मक आहे.

ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या व दुसऱ्या खंडांत शतर्चिन, मध्यम, गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज, वसिष्ठ, प्रगाथ, पावमानी, क्षुद्रसूक्त, महासूक्त, सूक्त, ऋच्, अर्धर्च, पद, या नावांचा व अक्षरादि शब्दांचा वेदानुसार अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. तो समाधानकारक नसला तरी एकदा पहाण्यासारखा आहे. त्यावरून ओढून ताणून वेदावर अर्थ लावण्याची प्रवृत्ति कशी सुरू झाली हें कळण्यासारखें आहे.

ऋषितर्पणांत ऋग्वेदसंहितेंतील ग्रंथकारांखेरीज इतरांचा समावेश नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

## ७. आचार्यतर्पण

आचार्यतर्पणांत अनेक शाखाप्रवर्तक, ग्रंथकार व संरक्षक अशा थोर विभूतींचा संग्रह केला आहे. त्यांच्यापैकीं ज्यांची कांहीं माहिती मिळाली ती टीपांत क्रमानें दिली आहे. परंतु ज्यांच्याबद्दल कांहीं माहिती मिळूं शकली नाहीं, त्याठिकाणीं तसें स्वच्छ लिहिलें आहे.

ब्रह्मयज्ञाच्या आरंभीं स्वाध्यायांत ज्या ग्रंथांचीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत, त्या ग्रंथांचे सर्व कर्ते आचार्यतर्पणांत क्रमानें घातलेले नाहींत, हें विशेष ध्यानांत धरण्यासारखें आहे. कांहीं ग्रंथकारांचा उल्लेख आचार्यतर्पणांत असून, त्यांच्या ग्रंथांचीं वाक्यें उद्धृत केलेलीं नाहींत.

विशेषत महाकौषीतक, महापैंग्य, सुयज्ञ, महैतरेय, सुजातवक्त्र, औदवाहि, महौदवाहि, सौजामि हे कोण, त्यांनीं कोणते ग्रंथ केले, त्यांचें आचार्यतर्पणांत नांव कां घेतलें जातें हें कांहीं सांगतां येत नाहीं.

वस्तुत आचार्यतर्पण व पितृतर्पण असा फरक करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण आचार्य हे आपले पितरच होत व त्याप्रमाणें सर्व ग्रंथांत म्हटलें आहे.

पण लोकांना पितृतर्पण म्हटलें की एकप्रकारचें भय वाटतें. आई बाप जिवंत असतां पितृतर्पण करनें करावयाचें असा भ्रम पडून असल्यामुळें पितृतर्पणांतच पितृतर्पण व आचार्यतर्पण असे दोन भाग पाडून ज्यांचा बाप जिवंत असेल त्यांनी फक्त पितृतर्पण गाळावें अशी व्यवस्था केली आहे.

ज्यांचा पिता जीवित आहे, अशा लोकांनीं आचार्यतर्पण करतांना आंगठ्यात जानवें घालून अपसव्य करावें. पिता जीवित नसेल तर पूर्ण अपसव्य करावें.

८. पितृतर्पण

पितृतर्पणाचा क्रम बाप, आजा, पणजा, आई, आजी (बापाची आई), पणजी (आजाची आई), सावत्र आई, आईचा बाप, आजा, पणजा, आईची आई, आजी, पणजी, स्वतःची पत्नी, पुत्र, मुलगी, चुलता, मामा, भाऊ, आत्या, मावशी, बहीण, श्वशुर, गुरु, कुलगुरु, शिष्य, मित्र अशा क्रमानें प्रत्येकीं मंत्र एकवारच म्हणून पाणी तीनदा द्यावं. आईची आई जीवित असेल तर आईच्या आजीपणजीचा उल्लेख करू नये.

इतका सविस्तर ब्रह्मयज्ञ करण्यास सवड नसेल तर केवळ 'आब्रह्मस्तम्ब पर्यन्तम्' हा समग्र मन्त्र म्हणून तीन वेळ पाणी दिलें तर चालतें.

## अन्यशाखीयांचा ब्रह्मयज्ञ

यजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी ब्राह्मणांच्या ब्रह्मयज्ञांत जी प्रथमादिकांची वाक्यें उच्चारलीं जातात, त्यांचाहि ऋग्वेदी ब्रह्मयज्ञांतील उपर्युक्त वाक्यांप्रमाणेंच बरोबर पत्ता लागू शकतो.

यजुर्वेदी लोकांत वेदांचीं केवळ आदिवाक्यें उच्चारीत नसून ग्रंथांच्या आरंभींच व शेवटचे अशा दोन्ही वाक्य ब्रह्मयज्ञांत म्हणतात. त्यामुळें ग्रंथारंभ व शेवट हे ज्ञात राहतात.

ऋग्वेदी ब्रह्मयज्ञांत ऋषितर्पणांत जी एकप्रकारची व्यवस्था व इतिहास दिसतो, तसा यजुर्वेदी वगैरेंच्या ब्रह्मयज्ञांत उपलब्ध होत नाहीं. हीच स्थिति देवता, आचार्य यांच्याहि बाबतींत आहे तथापि सर्व शाखांच्या ब्रह्मयज्ञांत एक प्रकारचा इतिहास भरलेला आहे तो इतिहास उकलण्याचे धागे मात्र अदृश्य झाले आहेत. ते अभ्यासानें दिव्य दृष्टि प्राप्त झाल्यास फक्त शक्य होईल. इतर ब्रह्मयज्ञांत सारांचाच प्राबल्य विशेष दिसतें. परंतु त्यासंबंधी नवी माहिती देतां येण्याचा संभव असल्यामुळें सध्या येथेंच थांबतों

# ब्रह्मयज्ञः

## अनुक्रम

# ब्रम्हयज्ञः ।



## ( १ ) संकल्पः

देव ऋषि–आचार्य–पितृतृप्तिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञेन यक्ष्ये ।

卐 卐

## ( २ ) वेदपठनम्

१. गायत्री मंत्र·

ॐ तत्स॑वि॒तुर्वरे॑ण्यं॒ भर्गो॑ दे॒वस्य॑ धीमहि
धियो॒ यो नः॑ प्रचो॒दया॑त् ॥ १ ॥

---

( १ ) संकल्प

देव, ऋषि आणि पितर या–च्या तृप्तिद्वारा परमेश्वराची प्रीति संपादण्याकरितां मी ब्रह्मयज्ञ करितों, असा संकल्प सोडून डाव्या गुडघ्यावर उजवा पाय ठेवून त्या उजव्या पायाच्या गुडघ्यावर डावा हात सरळ बोटें करून उताणा ठेवावा. त्यात वीतभर लांब दोन दर्भ घालून उजवा हात त्यावर पालथा घालावा. याला 'ब्रह्माञ्जलि' म्हणतात. ही ब्रह्माञ्जलि करून पाद, अर्धा आणि समग्र अशा क्रमानें गायत्री मंत्र म्हणावा. नंतर यथाशक्ति वेदपठन करावें आणि ब्रह्माञ्जलि विसर्जन करावी.

२. ऋग्वेद संहिता-प्रथम सूक्तम्

ॐ अग्निमीळे पुरोहितं, यज्ञस्य देवमृत्विजम् ।
होतारं रत्नधातमम् ॥ २ ॥
अग्निः पूर्वेभिर्ऋषिभि, रीड्यो नूतनैरुत ।
स देवाँ एह वक्षति ॥ ३ ॥
अग्निना रयिमश्नवत्, पोषमेव दिवेदिवे ।
यशसं वीरवत्तमम् ॥ ४ ॥

## ( २ ) वेदपठन

### १-२. गायत्री मंत्र आणि ऋग्वेदाचें प्रथम सूक्त

गायत्री मन्त्राचें पठन केल्यानंतर ऋग्वेदातील प्रथम सूक्ताचें पठन करावें. या मन्त्राचे ऋषि, देवता, छंद याचा उच्चार ब्रह्मयज्ञात करावयाचा नसतो, म्हणून ते येथे दिलेले नाहींत.

---

१. जो सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो, त्याच्या सर्वश्रेष्ठ तेजाची मी उपासना करितों. (ऋ. ३.६२.१०)

२. पुरोहित, यज्ञाचा देदीप्यमान ऋत्विज, होता, (आणि) अतिशय संपत्ति ।।।। अशा अग्नीची मी स्तुति करितो.

३. अग्नि पूर्वीच्या ऋषींना आणि नव्या ऋषींना स्तुत्य (होय). तो देवांना येथें आणितो.

४. (यजमान) अग्नीमुळे यश संपन्न आणि अतिशय वीर्यवान् पुनयुक्त रत्नोस प्राप्त करो.

अग्ने यं यज्ञमध्वरं, विश्वतः परिभूरसि ।
स इद् देवेषु गच्छति ॥ ५ ॥
अग्निर्होता कविक्रतु', सत्यश्चित्रश्रवस्तमः ।
देवो देवेभिरा गमत् ॥ ६ ॥
यदङ्ग दाशुषे त्व, मग्ने भद्रं करिष्यसि ।
तवेत् तत् सत्यमङ्गिरः ॥ ७ ॥
उप त्वाग्ने दिवेदिवे, दोषावस्तर्धिया वयम् ।
नमो भरन्त एमसि ॥ ८ ॥
राजन्तमध्वराणां, गोपामृतस्य दीदिविम् ।
वर्धमानं स्वे दमे ॥ ९ ॥
स नः पितेव सूनवे, ऽग्ने सूपायनो भव ।
सचस्वा नः स्वस्तये ॥ १० ॥

---

५ हे अग्ने, ज्या यज्ञात तू सामुख्याने असतोस, तोच (यज्ञ देवाप्रत पोचतो.

६. अग्नि (हा) कुशल, कापटरहित (आणि) अतिशयेकरून कीर्तिमान् (असा) होमसंपादक (होय). तो (अग्नि) देवासहित येथ येवो

७ हे अग्नि, हविर्दान करणाराचं तू कल्याण करशील, ते कल्याण, हे अंगिरा, अग्ने, खरोखर तुझेच होतें.

८ हे रात्रीच्या वेळी प्रकाशणाऱ्या अग्ने, प्रतिदिनी नमस्कार करीत आम्ही बरपा बानियाला येत असतो

९-१० जो तू यज्ञाचा राजा, धर्मकृत्याचा तेजस्वी रक्षक (आणि) स्वत च्या घरी वृद्धिंगत होतोस, तो तू, हे अग्ने, जसा पिता पुत्राला सुगम असतो, असा तू आम्हाला हो. आमच्या कल्याणाकरिता आम्हाबरोबर रहा.

## (३) देवतातर्पणम्

१. ॐ प्रजापतिस्तृप्यतु ।
२. ब्रह्मा तृप्यतु ।
३. वेदास्तृप्यन्तु ।
४. देवास्तृप्यन्तु ।
५. सर्वाणि छन्दांसि तृप्यन्तु ।
६ ॐ कारस्तृप्यतु ।
७ वषट्कारस्तृप्यतु ।
८ व्याहृतयस्तृप्यन्तु ।
९ सावित्री तृप्यतु ।
१० यज्ञास्तृप्यन्तु ।
११ द्यावापृथिवी तृप्येताम् ।
१२. अन्तरिक्ष तृप्यतु ।
१३ अहोरात्राणि तृप्यन्तु ।
१४ साध्यास्तृप्यन्तु ।
१५. सिद्धास्तृप्यन्तु ।
१६. समुद्रास्तृप्यन्तु ।
१७ नद्यस्तृप्यन्तु ।
१८. गिरयस्तृप्यन्तु ।
१९. क्षेत्रौषधिवनस्पति-
गन्धर्वाप्सरसस्तृप्यन्तु ।
२०. नागास्तृप्यन्तु ।
२१. वयांसि तृप्यन्तु ।
२२. गावस्तृप्यन्तु ।
२३. साध्यास्तृप्यन्तु ।
२४. विप्रास्तृ प्यन्तु ।
२५ यक्षास्तृप्यन्तु ।
२६ रक्षांसि तृप्यन्तु ।
२७ भूतानि तृप्यन्तु ।

卐 卐

## ( ४ ) ऋषितर्पणम्

१ शतर्चिनस्तृप्यन्तु ।
२ माध्यमास्तृप्यन्तु ।
३ गृत्समदस्तृप्यन्तु ।
४ विश्वामित्रस्तृप्यन्तु ।
५ वामदेवस्तृप्यन्तु ।
६ अत्रिस्तृप्यतु ।
७ भरद्वाजस्तृप्यतु ।
८ वसिष्ठस्तृप्यतु ।
९ प्रगाथास्तृप्यन्तु ।
१० पावमान्यस्तृप्यन्तु ।
११ क्षुद्रसूक्तास्तृप्यन्तु ।
१२ महासूक्तास्तृप्यन्तु ।

卐 卐

---

## ( ४ ) ऋषितर्पण

ऋषितर्पणामध्यें एकंदर बारा ऋषींचा समावेश आहे या ठिकाणीं ऋग्वेदातील मंत्रद्रष्ट्या आचार्यांना उद्देशून 'ऋषि' शब्दाचा वापर केलेला आहे ऋषितर्पणातील ऋषींचा क्रमहि ऋग्वेदास अनुसरूनच ठेवण्यात आलेला आहे

ऋषींचें हें तर्पण 'प्राचीनावीति' ( माळेसारखें जानवें करून ) करावयाचें असत त्यासाठीं ऋषींच्या नावाचा क्रमश उच्चार करून 'ऋषितीर्था' नें ( करंगळीच्या मूळ भागानें ) त्यास प्रत्येकी दोन वेळा पाणी द्यावें

ऋषितर्पणामध्य ऋग्वेदाच्या दहाहि मंडलाच्या मंत्रद्रष्ट्या ऋषिविषयीची कृतज्ञता व्यक्त करण्यात आली आहे यापैकीं शतर्चिन आणि माध्यम हे ऋग्वेदाच्या प्रथम मंडलाचे मंत्रद्रष्टे आचार्य आहेत गृत्समद आणि त्याचे वंशज हे दुसऱ्या मंडलाचे प्रणेते आहेत

विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज वसिष्ठ आणि प्रगाथ काण्व हे क्रमश तिसऱ्या, चौथ्या, पांचव्या, सहाव्या, सातव्या आणि आठव्या मंडलाचे प्रवर्तक आचार्य मानले जातात

ऋग्वेदातील नवव्या मंडलातील ऋचा या पवमान सोम देवतेस उद्देशून लिहिल्या आहेत म्हणून त्यांचेंच तर्पण करण्यात आलें आहे

## ( ५ ) आचार्यतर्पणम्

१. सुमन्तु-जैमिनि-वैशंपायन-पैल-सूत्र-भाष्य-भारत-महाभारत धर्माचार्यास्तृप्यन्तु ।

---

ऋग्वेदातील दहाव्या मंडलाचे द्रष्टे अनेक असल्यामुळें 'क्षुद्र-सूक्त' आणि 'महा-सूक्त' असा त्यांचा वेगळ्याच पद्धतीनें निर्देश करण्यात आला आहे. ऋग्वेदातील दहाहि मंडलांतील द्रष्ट्यांचा उल्लेख येथें करण्यात आलेला आहे

卐 卐

## ( ५ ) आचार्यतर्पण

आचार्यतर्पणामध्ये वेद, महाभारत, शाखा आदींचे प्रणयन करणाऱ्या आचार्यांना तर्पण करण्यात येतें. आचार्यांचें हें तर्पण अपसव्य करून आणि 'पितृतीर्थानें ( आंगठ्याच्या मूळ भागाजवळून ) प्रत्येक आचार्यांच्या नावानें तीन वेळा पाणी देऊन करण्यात येतें.

आचार्यतर्पणामध्ये निर्देशिलेल्या आचार्यांची माहिती खाली देण्यात आलेली आहे:-

१. या ठिकाणी निर्देशिलेले सुमन्तु, जैमिनि, वैशंपायन आणि पैल हे चार आचार्य व्यास महर्षींच्या वेदशिष्यपरंपरेपैकी चार शाखाप्रवर्तक आचार्य मानले जातात. यापैकीं सुमन्तु हा व्यासांचा अथर्ववेदांतील, जैमिनि हा सामवेदांतील, वैशंपायन हा यजुर्वेदातील आणि पैल हा ऋग्वेदातील, असून शिष्य होत. म्हणूनच हे आचार्य त्या त्या वेदाचे आद्यप्रवर्तक आचार्य मानले जातात.

धर्मग्रंथात आचार्यांची व्याख्या पुढीलप्रमाणे केलेली आहे :-

आचिनोति च शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि ।
स्वयमेवाचरेद्यस्तु स आचार्य इति स्मृतः ॥

( जो शास्त्रार्थांचा प्रसार करतो, लोकांना त्याप्रमाणे वागावयास लावतो आणि स्वतःहि आचरण करतो त्याला 'आचार्य' असे म्हणतात. )

२. जानन्ति-बाहवि-गार्ग्य-गौतम-शाकल्य-बाभ्रव्य-माण्डव्य-माण्डूकेयास्तृप्यन्तु ।

| | |
|---|---|
| ३. गार्गी वाचक्नवी तृप्यतु । | ८ महाकौषीतकं तर्पयामि । |
| ४. वडवा प्रातिथेयी तृप्यतु । | ९. पैङ्ग्यं तर्पयामि । |
| ५. सुलभा मैत्रेयी तृप्यतु । | १०. महापैङ्ग्यं तर्पयामि । |
| ६. कहोळं तर्पयामि । | ११. सुयज्ञं तर्पयामि । |
| ७. कौषीतकं तर्पयामि । | १२ सांख्यायनं तर्पयामि । |

---

यापैकीं वैशंपायन हा व्यासाच्या महाभारतपरंपरेतील मुख्य प्रमुख शिष्य होय. वैशंपायनाचे या कर्तृत्वाचा निर्देश उपर्युक्त आचार्यांच्या तर्पणात ' भारत-महाभारत-धर्माचार्य ' म्हणून करण्यात आला आहे

२. जानन्ति, बाहवि, गार्ग्य, गौतम, शाकल्य बाभ्रव्य, माण्डव्य आणि माण्डूकेय हे माण्डूकेयगणातील आचार्य होत

३-५. गार्गी वाचक्नवी, वडवा प्रातिथेयी, सुलभा मैत्रेयी ह्या बृहदारण्यक उपनिषदामध्यें निर्देशिलेल्या ' ब्रह्मवादिनी ' स्त्रिया आहेत यापैकीं गार्गी ही वचक्नूची कन्या होती. तिनें जनकाच्या यज्ञात याज्ञवल्क्याशी वादविवाद केला. (बृ उ ३ ६ ८). ती वेदांतविद्येत फार निष्णात होती. त्याचप्रमाणें वडवा प्रातिथेयी आणि सुलभा मैत्रेयी याहि स्त्रिया आहेत गार्गी, वडवा आणि मैत्रेयी हीं त्या स्त्रियांचीं विशेष नामे असून वाचक्नवी, प्रातिथेयी आणि मैत्रेयी हीं कुलनाम आहेत. मैत्रेयी ही याज्ञवल्क्याची पत्नी होती

६-१२. कहोळ, कौषीतक, महाकौषीतक, पैंग्य, महापैंग्य, सुयज्ञ आणि सांख्यायन हे सांख्यायनगणातील आचार्य होत.

यापैकीं कहोळ हा एक जनकाच्या यज्ञात याज्ञवल्क्याबरोबर तत्त्वज्ञानात वाद विवाद करणारा तत्त्वज्ञानी होता त्याच्या बापाचे नाव कुषीतक होते (बृ उ. ३ ५.१)

कौषीतक हा सांख्यायन ब्राह्मणाचा कर्ता होय

पैंग्य याचे नावावर ' पैंग्य ब्राह्मण ' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. निरुक्तकार यास्क यालाहि ' पैंग्य ' असे म्हणत असत.

सांख्यायनाचें श्रौतसूत्र प्रसिद्ध आहे.

१३ ऐतरेय तर्पयामि ।
१४. महैतरेय तर्पयामि ।
१५ शाकल तर्पयामि ।
१६. सुजानवक्त्र तर्पयामि
१७. औदवाहिं तर्पयामि ।
१८. महौदवाहिं तर्पयामि ।
१९. सौजामिं तर्पयामि ।
२०. शौनक तर्पयामि ।
२१. आश्वलायन तर्पयामि ।

२२. ये चान्ये आचार्यास्ते सर्वे तृप्यन्तु ।

卐 卐

## ( ६ ) पितृतर्पणम्

१. अस्मत्पितरम् अमुकशर्माणं अमुकगोत्र वसुरूप स्वधा नमस्तर्पयामि ।

२ अस्मत्पितामहम् अमुकशर्माणं अमुकगोत्र रुद्ररूप स्वधा नमस्तर्पयामि ।

---

१३–२१. ऐतरेय, शाकल, बाष्कल, सुजातवक्त्र, औदवाहि, महौदवाहि, सौजामि, शौनक आणि आश्वलायन हे आश्वलायनगणातील आचार्य होत.

शाकल हा शाकल नावाच्या ऋग्वेदाच्या शाखेचा प्रवर्तक होय.

आश्वलायन हा सुप्रसिद्ध आश्वलायन गृह्य आणि श्रौत सूत्राचा कर्ता होय.

२२. अशा तऱ्हेने मुख्य आचार्यांना तर्पण केल्यानंतर बाकी अज्ञात आचार्यांनाहि तर्पण करावे.

卐 卐

## ( ६ ) पितृतर्पण

देवतातर्पण, ऋषितर्पण आणि आचार्य तर्पणानंतर पितरांचे तर्पण करावे. पितृतर्पणात खालील प्रमाणे तर्पण करावें –

३. अस्मत्प्रपितामहम् अमुकशर्माणं अमुकगोत्र आदित्यरूप स्वधा नमस्तर्पयामि ।

४ अस्मन्मातरम् अमुकनाम्नी अमुकगोत्रां वसुरूपा स्वधा नमस्तर्पयामि ।

५ अस्मत्पितामही अमुकनाम्नी अमुकगोत्रां रुद्ररूपां स्वधा नमस्तर्पयामि ।

६ अस्मत्प्रपितामही अमुकनाम्नीं अमुकगोत्रां आदित्यरूपा स्वधा नमस्तर्पयामि ।

७ अस्मत्सापत्नमातर अमुकनाम्नी अमुकगोत्रा वसुरूपां स्वधा नमस्तर्पयामि ।

८ अस्मन्मातामह अमुकशर्माणं अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

९ अस्मन्मातृपितामह अमुकशर्माणं अमुकगोत्र रुद्ररूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

१० अस्मन्मातृप्रपितामह अमुकशर्माणं अमुकगोत्र आदित्यरूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

११ अस्मत्पुत्र अमुकशर्माणं अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक सापत्य स्वधा नमस्तर्पयामि ।

१२ अस्मद्दुहितर अमुकनाम्नी अमुकगोत्रां वसुरूपा सभर्तृकां सापत्यकां स्वधा नमस्तर्पयामि ।

---

१. बाप २ आजा ३ पणजा ४ आई ५ आजी ( बापाची आई ) ६ पणजी ( आजाची आई ) ७ सावत्र आई ८ आईचा बाप ९ आजा १०. पणजा ११ स्वतःची पत्नी १२ पुत्र १३ मुलगी १४ तुल्ता

१३ अस्मत्पितृव्य अमुकशर्माण अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

१४. अस्मद्गुरु अमुकशर्माण अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

१५ अस्मद्भ्रातर अमुकशर्माण अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक सापत्य स्वधा नमस्तर्पयामि ।

१६ अस्मत्पितृष्वसार अमुकनाम्नी अमुकगोत्रा वसुरूपा सभर्तृका सापत्यका स्वधा नमस्तर्पयामि ।

१७ अस्मन्मातृष्वसार अमुकनाम्नी अमुकगोत्रा वसुरूपा सभर्तृका सापत्यका स्वधा नमस्तर्पयामि ।

१८ अस्मत श्वशुर अमुकशर्माण अमुकगोत्र वसुरूप सपत्नीक स्वधा नमस्तर्पयामि ।

१९. अस्मदाचार्य अमुकशर्माण अमुकगोत्र वसुरूप स्वधा नमस्तर्पयामि ।

卐 卐 卐

---

१५. मामा, १६. आत्या, १७. मावशी, १८. सासरे, १९ आचार्य; २०. श्वशुर २१. गुरु, २२. कुलगुरु, २३. कुलगुरुपत्नी, २४ शिष्य, २५ मित्र.

उपर्युक्त तर्पणामध्ये ज्याला तर्पण करावयाचें त्या व्यक्तीचे आरव नातें, तिचे नाव, गोत्र आदींचा उच्चार करून तीन तर्पण करावें

या तर्पणामध्ये तर्पणाचा विशिष्ट मंत्र म्हणून नंतर त्या व्यक्तीच्या नावानें तीन पळ्या पाणी सोडावे या पाण्यामध्ये थोडे काळे तीळ घातलेले असावेत.

卐 卐 卐

## आगामी कोश-ग्रंथ

### प्राचीन भारतीय स्थलकोश

या कोश-ग्रंथात वेद, पुराणे, महाभारत, रामायण, चिनी प्रवासी, टॉलेमी, पेरिप्लस, जैन व बौद्ध ग्रंथ तसेच शिलालेख-साहित्य यामध्ये ग्रथित केलेले प्राचीन भारतीय भूगोल-विषयक साहित्य सुसंगत, सुस्पष्ट आणि साधार पद्धतीने ग्रथित केले आहे

येवढ्या व्यापक पद्धतीने प्राचीन भारतीय भूगोलविषयक कोश-ग्रंथ मराठीतच काय अन्य कोणत्याही भारतीय भाषा-मध्ये आजवर झालेला नाही

* * *

### भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश

सुमारे तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या या अद्वितीय कोश-ग्रंथाचे नवे परिवर्धित संस्करण सुमारे ६०० पेक्षा अधिक पृष्ठांची नवी माहिती समाविष्ट करून नव्याने प्रसिद्ध करण्यात येत आहे

भारतीय चरित्रकोश मंडळ, पुणें ४